






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)
महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका








# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक २८६, जुलै-ऑगस्ट-सप्टेंबर १९९८



महाराष्ट्र साहित्य परिषद पारितोषिक :
श्री. भा. द. खेर यांना देताना,
अ. भा. म. साहित्य संमेलनाचे
अध्यक्ष द. मा. मिरासदार,
बाबा कलगुटकर, श्री. राजेंद्र बनहट्टी
डॉ. गं. ना. जोगळेकर

अनुक्रमणिका

अनुक्रमणिका

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक २८६ - जुलै-ऑगस्ट-सप्टेंबर १९९८

□

संपादक
ह. ल. निपुणगे

□

**संपादन समिती**
राजा फडणीस (प्र. कार्यवाह)
प्रा. श्रीराम पुजारी
डॉ. वि. भा. देशपांडे
डॉ. ल. रा. नसिराबादकर
डॉ. अंजली सोमण
प्रकाश होळकर

□

महाराष्ट्र साहित्य परिषद
टिळक रोड,
पुणे ४११ ०३०.
दूरध्वनी : ४७५९६३

अनुक्रमणिका

# अनुक्रमणिका






मुद्रक-प्रकाशक : राजा फडणीस, प्रमुख कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रोड, पुणे ४११ ०३०.

मुद्रणस्थळ : जंगम ऑफसेट प्रा. लि., २५/१०, नांदेड फाटा, पुणे ४११ ०४१.

मुखपृष्ठ रचना : स. म. जंगम

संगणकीय अक्षरजुळणी : यशश्री एंटरप्रायजेस, कोथरूड, पुणे ४११ ०२९.

मूल्य : रुपये तीस वार्षिक वर्गणी संस्थांसाठी : शंभर रुपये.

आजीव सदस्य शुल्क : रु. ५००/- वार्षिक सदस्य शुल्क : रु. ५०/-

अंक क्र. २८६ जुलै-ऑगस्ट-सप्टेंबर १९९८

महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाने या नियतकालिकाला अनुदान दिले आहे.

# संपादकीय

ह. ल. निपुणगे

महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचा हा जुलै-ऑगस्ट-सप्टेंबर ९८ चा अंक अनेक अंगांनी वैशिष्ट्यपूर्ण करण्याचा प्रयत्न केला आहे, हे वाचकांच्या अंक हाती येताच लक्षात येईल.

सुप्रसिद्ध समीक्षक डॉ. व. दि. कुलकर्णी यांनी दि. २३ ऑगस्ट, १९९८ ला वयाची ७५ वर्षे पूर्ण केली आहेत. त्यांच्या वैशिष्ट्यपूर्ण, वैविध्यपूर्ण साहित्यिक कामगिरीचे दर्शन घडविणारा डॉ. स्वाती कर्वे यांचा विस्तृत लेख वाचकांना निश्चित आवडेल. तसेच श्री. गंगाधर गाडगीळ यांनीही आपल्या वयाची ७५ वर्षे दिनांक २५ ऑगस्ट, १९९८ रोजी पूर्ण केली आहेत. डॉ. अरविंद वामन कुलकर्णी यांनी 'गंगाधर गाडगीळ : व्यक्ती आणि सृष्टी'च्या निमित्ताने लिहिलेला, या ग्रंथाची चिकित्सा करणारा लेख वाचकांना हा ग्रंथ मुळातून वाचायला उद्युक्त करील, असाच आहे.

प्रसिद्ध कथालेखक आणि कादंबरीकार श्री. रंगा मराठे हेही साहित्य परिषदेच्या कार्यकारिणीवर गेली अनेक वर्षे कार्य करीत आहेत. म. सा. प.च्या ग्रंथालयासाठी त्यांनी खूप काम केले आहे. अजूनही करीत आहेत. या वयातही त्यांची काम करण्याची जिद्द वाखाणण्यासारखी आहे. त्यांनीही २९ जून, १९९८ रोजी आपल्या वयाची ७५ वर्षे पूर्ण केली आहेत.

अमृतमहोत्सवी वर्षे पूर्ण करणाऱ्या या तिघाही ज्येष्ठ साहित्यिकांचे अभीष्टचिंतन करताना विशेष आनंद वाटतो. या तिघांनाही साहित्यसेवेसाठी आरोग्यपूर्ण दीर्घायुष्य लाभावे याच शुभकामना.

गेली पन्नास वर्षे महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या उत्कर्षाला हातभार लावणारे श्री. म. श्री. दीक्षित यांनी १६ मे, १९९८ रोजी ७५ व्या वर्षात पदार्पण केले आहे. तसेच संतवाङ्मयाचे अभ्यासक आणि लेखक डॉ. प्र. न. जोशी यांनी २४ एप्रिल, १९९८ रोजी ७५ व्या वर्षात पदार्पण केले आहे.

तसेच महाराष्ट्र साहित्य परिषदेशी गेली अनेक वर्षे निकटचा संबंध असलेले विचारवंत, शिक्षणतज्ज्ञ डॉ. प्र. ल. गावडे यांनीही २० जून, १९९८ रोजी ७५ व्या वर्षात पदार्पण केले आहे. अमृतमहोत्सवी वर्षात पदार्पण करणाऱ्या या तिघाही ज्येष्ठ साहित्यिकांना त्यांच्या आरोग्यपूर्ण दीर्घायुष्यासाठी हार्दिक शुभेच्छा !

या आनंदाच्या घटना घडत असतानाच काही दुःखद घटनांनाही सामोरे जावे लागले. सुप्रसिद्ध, सिद्धहस्त लेखक गोपाल नीळकण्ठ दाण्डेकर यांचे १ जून, १९९८ रोजी दुःखद निधन झाले. गेली अनेक वर्षे ते विविध आजारांशी झुंज देत होते. या सर्व दुखण्यांतही त्यांचे मनोधैर्य टिकून होते. कै. आप्पांचा आणि माझा काही वर्षांपूर्वी खूपच निकटचा संबंध आला होता. त्यांच्या प्रेमळ स्वभावाचा प्रत्यय मला त्यावेळी आला. त्यांचे मराठी साहित्यावर अमाप

प्रेम होते. त्यामुळेच साहित्याच्या विविध प्रांतात त्यांनी वैशिष्ट्यपूर्ण लेखन केले. त्यांनी लिहिलेल्या 'पवनाकाठचा धोंडी', 'माचीवरला बुधा', 'पडघवली' या कादंबऱ्या मराठी साहित्यात अजरामर राहतीलच, तसेच त्यांनी संपादित केलेले अनेक धार्मिक ग्रंथही दीर्घकाळ वाचकांच्या वाचनात राहतील.

कै. आप्पांना आपल्या लेखनाविषयी प्रचंड आत्मविश्वास होता. आपण लिहू ते वाचकांना निश्चित आवडेल यावद्दल त्यांना नेहमीच खात्री असे. त्यांनी अनेक छोटी-मोठी चरित्रे लिहिली. त्यातील 'संत गाडगेमहाराज' हे एक अप्रतिम चरित्र आहे. हे लिहून झाले आणि हस्तलिखित त्यांचे प्रकाशक कै. केशवराव कोठावळे यांच्या हाती देताना ते म्हणाले, 'केशवराव या ग्रंथाच्या दहा हजार प्रती छापा. एक-दोन वर्षांत सहज जातील.'

केशवराव कोठावळे त्यांच्याकडे आश्चर्याने बघू लागले. त्यांचेही या पुस्तकाची पहिली आवृत्ती एवढी मोठी काढण्याचे धाडस झाले नाही. तरीही हा ग्रंथ खूपच चांगला खपला एवढे मात्र खरे !

कै. आप्पांनी लिहिलेल्या अनेक साहित्यकृतींवद्दल असेच म्हणता येईल. त्यांनी आपले लेखन अत्यंत निष्ठेने आणि आत्मविश्वासाने केले. त्यांच्यासारखा बहुविध विषयांवर लिहिणारा लेखक यापुढे निर्माण व्हावा असेच त्यांच्या आत्म्याला निश्चित वाटत राहणार. मराठी साहित्यावर, लेखकांवर, आपल्या प्रकाशकांवर आणि वाचकांवर तर खूपच प्रेम करणारा हा सिद्धहस्त लेखक आज आमच्यात नाही, याबद्दल खूपच दु:ख होत आहे. कै. आप्पांच्या आत्म्याला चिरशांती लाभण्यासाठी मराठी साहित्यात, आत्मविश्वासाने लिहिणारे, साहित्यावर प्रेम करणारे अनेक लेखक आणि वाचक निर्माण व्हायला हवेत.

आज जरी कै. आप्पा आमच्यात नसले तरी त्यांच्या साहित्यरूपाने ते सदैव आमच्यात आहेत. त्यांचे कोणतेही पुस्तक वाचताना ते आमच्या सतत डोळ्यांसमोर उभे राहतात.

संत साहित्याचे अभ्यासक आणि महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अध्यक्ष डॉ. मधुकर आष्टीकर आणि साधना साप्ताहिकाचे संपादक आणि तरुणांचे आवडते लेखक आणि सामाजिक कार्यकर्ते श्री. यदुनाथ थत्ते यांचेही नुकतेच दु:खद निधन झाले.

डॉ. आष्टीकर यांच्या नुकत्याच प्रकाशित झालेल्या 'श्री चांगदेव पासष्टी व विज्ञानानुभव' या ग्रंथाची समीक्षा करणारा डॉ. अरुण निगवेकर यांचा लेख आणि 'यदुनाथ थत्ते-साहित्यिक आणि सामाजिक कार्यकर्ता' हा डॉ. अनिल गोडबोले यांचा लेख-हे दोन्ही लेख म्हणजे या ज्येष्ठ साहित्यिकांना श्रद्धांजलीच होय.

प्रसिद्ध विनोदी लेखक आणि अ. भा. म. सा. संमेलनाच्या कोल्हापूर येथे झालेल्या संमेलनाचे अध्यक्ष, रमेश मंत्री आणि महाराष्ट्र, माया, माणिक आणि माधुरी या चार मासिकांचे माजी संपादक व महाराष्ट्र साहित्य परिषदेचे कार्यकर्ते पां. र. अंबिके आणि गोव्याचे शशिकांत नार्वेकर यांचे नुकतेच दु:खद निधन झाले.

या सर्वांना हार्दिक श्रद्धांजली. ईश्वर या सर्वांच्या आत्म्याला चिरशांती देवो, हीच प्रार्थना. □



अनुक्रमणिका

# विमल प्रतिभेचे सहृदय समीक्षक : डॉ. व. दि. कुलकर्णी

डॉ. स्वाती कर्वे



अभिनव गुप्ताने 'सारस्वताचे सार जाणून घेऊन ते रसिकवृत्तीने श्रोत्यांसमोर ठेवणाऱ्या रसिकांना 'विमल प्रतिभेचे सहृदय' म्हटले आहे. ही उपाधी मराठीचे ज्येष्ठ समीक्षक आणि अभ्यासक डॉ. व. दि. कुलकर्णी यांना शोभून दिसणारी आहे.

पुढील महिन्यात २३ ऑगस्ट १९९८ ला सर आपले अमृतमहोत्सवी वर्ष पूर्ण करीत आहेत. जून १९५६ मध्ये सरांची नेमणूक स. प. महाविद्यालयात मराठी व संस्कृत या विषयांचे व्याख्याते म्हणून झाली आणि मराठी भाषा, साहित्य यांच्याबरोबर सरांचे कायमस्वरूपी नाते निर्माण झाले. तेव्हापासून आजपर्यंत त्यांनी मराठी भाषा, साहित्याची संशोधन, अध्यापन, संपादन अशा विविध रूपांनी व्रतस्थ राहून अथकवृत्तीने सेवा केली आहे. त्यांच्या नावावर असणारी ग्रंथपरंपरा ही त्यांच्या या प्रदीर्घ कार्याची प्रत्यक्ष रूपेच आहेत.

सरांच्या समीक्षा लेखनाची व्याप्ती मोठी आहे. विविधतापूर्ण आहे. (त्यासाठीच प्रस्तुत लेखावरोबर त्यांची साहित्यसूची या अंकात प्रसिद्ध केली आहे.) संख्येनेही ही ग्रंथपरंपरा अधिक आहे. खरं तर हा स्वतंत्र संशोधनाचा विषय आहे. असं असताना एका लेखाच्या मर्यादेत त्यांचा सर्वांगीण आढावा घेणे हे धाडसाचे तसेच अवघड काम आहे.

लेखाच्या मर्यादा विचारात घेऊन काही महत्त्वाचे व मोजके मुद्दे मी या ठिकाणी विवेचनासाठी स्वीकारले आहेत.



डॉ. व. दि. कुलकर्णी यांच्या समीक्षाकार्याचे स्वरूप, व्याप्ती आणि त्यातील वैविध्य स्पष्ट करणे, त्यांची समीक्षादृष्टी व वृत्ती कशी विकसित झाली आहे. त्यांची कलात्मकदृष्टी कोणती आहे? समीक्षादृष्टीचा पाया कोणता आहे? तिचे अंतरंग कसे आहे? साहित्य संशोधन आणि समीक्षा यांची एक स्वतंत्र पद्धत (Method) त्यातून कशी निर्माण झाली आहे याचे विवेचन करून या दृष्टिकोनातून त्यांनी केलेल्या समीक्षेचा काही मुद्द्यांच्या आधारे विचार करणे योग्य होईल. संपादनामध्येही स्वतंत्रभूमिका कोणती ठेवली आहे, त्यामधील काही प्रमुख ग्रंथांचे संपादन त्यांनी कसे केले आहे; याचा विचार करणे आवश्यक आहे. त्यांनी मराठी समीक्षेला काय दिले आहे? त्यांच्या .

**डॉ. स्वाती सुहास कर्वे**
**पत्ता :** १४१४ कसबा पेठ,
शनिवारवाड्यासमोर, पुणे-११
**फोन :** ४५६९९५
**शिक्षण :** एम.ए.,बी.एड., पीएच्.डी.
**विशेष :** दोन वेळा आदर्श पुरस्काराने सन्मानित. 'पाणी' या नाटकाचे लेखन व दिग्दर्शनासाठी सकाळ नाट्यवाचन स्पर्धेचे पारितोषिक. विविध वाङ्मयीन पुरस्कार निवडसमितीवर काम. महाविद्यालयीन जीवनापासून लेखनाला प्रारंभ. लघुकथा लेखन, प्रवासवर्णन, ग्रंथपरीक्षणे, नभोनाट्य, समीक्षात्मक विविध प्रकारचे लेखन केले आहे. २५ लघुकथा, ५० वाङ्मयीन, तसेच विविध प्रकारचे लेख प्रसिद्ध. 'स्त्री आणि स्त्रीवाद' लेखमाला प्रसिद्ध. आकाशवाणीवरून 'नवी पहाट', 'माँ जिती माँ सिकंदर' ही नभोनाट्ये प्रसारित. ग्रंथपरीक्षणे, भाषणे, चर्चा यांमध्ये सहभाग. एम.फील. प्रबंधिका विषय : 'नाटककार दळवी' (सभ्य गृहस्थ हो ! ते पुरुष!)
पीएच्.डी. प्रबंध विषय : 'लघुकादंबरीची संकल्पना व मराठी लघुकादंबरी'.
समीक्षात्मक ग्रंथ — 'दळवींची नाटके : एक अंतर्वेध'
-राज्य मराठी विकास संस्थेच्या वतीने 'सकाळ' वृत्तपत्राचे कार्य' या विषयावर संशोधनपर पुस्तकाचे लेखन पूर्ण केले आहे.
-'स्वातंत्र्योत्तर काळातील मराठी साहित्यातील स्त्री प्रतिमा'
-सेंट मीरा महाविद्यालयातर्फे आयोजित चर्चासत्रात पेपर वाचन.
-'मराठी कादंबरीतील बदलते स्त्रीचित्रण' वसंत व्याख्यानमाला व्याख्यान.
सूत्रसंचालन, निवेदन याची खास आवड.

पंचाहत्तरी निमित्त या समीक्षेचा काही स्वतंत्र विचार करणे कसे शक्य आहे, त्या विषयी काही विचार व्यक्त करणे मला महत्त्वाचे वाटते.

आपले व्यक्तिमत्त्व अभ्यासूवृत्तीला कसे अधिक जवळचे आहे याची त्यांना जाणीव होतीच. त्यांचे थोरले बंधू उद्धवराव यांनीही त्यांना ज्ञानोपासनेचाच मार्ग स्वीकारण्याचा सल्ला दिला होता. त्याप्रमाणे त्यांनी महाविद्यालयीन शिक्षणाला सुरुवात केली; परंतु प्रथम ते शास्त्रशाखेचे विद्यार्थी होते. गणित व पदार्थविज्ञान हे प्रधान विषय घेऊन बी. एस्सी व्हावे असा त्यांचा विचार होता. परंतु घरच्या परिस्थितीने, वडील बंधू उद्धवराव यांचा अचानक मृत्यू झाल्याने त्यांच्या शिक्षणात दीर्घकाळ खंड पडला. त्यानंतर नऊ वर्षांनी त्यांनी कलाशाखेकडे येऊन आपले शिक्षण पुन्हा सुरू केले. प्रथम इंग्रजी विषय, त्यानंतर मराठी विषय घेऊन ते बी. ए. आणि एम्. ए. झाले. बी. ए. ला विद्यापीठात प्रथम येऊन त्यांनी त्या विषयाची सर्व बक्षिसेही मिळविली. त्यानंतर दीर्घकाळ ते शालेय अध्यापनात अडकून पडले होते. अखेर जून ५६ मध्ये पुण्याच्या स. प. महाविद्यालयात त्यांना मनाजोगती नोकरी मिळाली. लेखन, वाचन, व्यासंग यांसाठी पोषक वातावरण मिळाले. १९५४ मध्ये त्यांचा विवाह झाला. आपल्या लौकिक आणि व्यावहारिक जीवनाची सूत्रे त्यांनी सौ. सुमित्राबाईंच्या हाती सोपवली आणि स्वतःला वाङ्मयसेवेला वाहून घेतले; ते कायमचेच. हे सर्व प्रास्ताविकाप्रमाणे सांगण्याचा हेतू एवढाच की मनाप्रमाणे काम करण्याची संधी, उसंत आणि क्षेत्र



अनुक्रमणिका

## डॉ. व. दि. कुलकर्णी जीवनपट

**संपूर्ण नाव** : वसंत दिगंवर कुलकर्णी

**जन्म** : २३ ऑगस्ट १९२३. मराठवाड्यात पखरुड गावी. (जि. उस्मानावाद)

**शालेय शिक्षण** : म्युनिसिपल प्राथमिक शाळा (बार्शी) आणि सुलाखे हायस्कूल, बार्शी. मॅट्रिक १९४०.

**महाविद्यालयीन शिक्षण** : फर्ग्युसन कॉलेज, पुणे. बी. ए. (मराठी-संस्कृत) पुणे विद्यापीठ, प्रथम श्रेणी, सर्वप्रथम. दक्षिणा फेलो, फर्ग्युसन कॉलेज, १९५१

एम्. ए. (मराठी-संस्कृत) बाहेरून बसलेल्या विद्यार्थ्यांत सर्वप्रथम, विद्यापीठीय पारितोषिक, १९५५

पीएच्. डी, मुंबई विद्यापीठ, १९७५. विषय 'संगीत सौभद्र' : घटना आणि स्वरूप.

**अध्यापन** : प्रारंभी दहा वर्षे रहिमतपूर, पुणे, कराची, माळीनगर, हैद्राबाद येथे हायस्कूलमध्ये शिक्षक.

स. प. महाविद्यालय, पुणे - मराठी व संस्कृत विषयाचे व्याख्याते - १९५६ ते १९५९

पार्ले महाविद्यालय, मुंबई - ५७- मराठी विभाग प्रमुख - १९५९ ते १९७१

मुंबई विद्यापीठ, मराठी विभाग - १९७१ ते १९८३ विभागप्रमुख म्हणून निवृत्त.

**लेखन** : प्रारंभ १९४५ मध्ये 'गॅलिलिओ' या चरित्रपुस्तिकेने. नंतर १९५५ पासून विविध नियतकालिकांतून विविध प्रकारचे लेखन : प्रामुख्याने समीक्षा, ग्रंथ लेखन, संपादन इत्यादी.

**व्याख्याने, व्याख्यानमाला** : विद्यापीठीय व बहि:शाल व्याख्यानमाला, साहित्य-संमेलने, वाङ्मयीन परिषदा, धार्मिक-सांस्कृतिक संस्था इत्यादींमध्ये व्याख्याने, निवंधवाचन, चर्चा इ. 'नभोवाणी' (पुणे, मुंवई), दूरदर्शन (मुंबई, पुणे) सहभाग.

**अन्य उपक्रम, कार्य** : विविध शैक्षणिक, साहित्यिक, सांस्कृतिक संस्थांचे क्रियाशील पदाधिकारी, सल्लागार, मार्गदर्शक, महाराष्ट्र राज्य ग्रंथ पुरस्कार आणि अन्य.

**निवास** : १५, वृंदावनकुंज, ७५९/१२६ बी, प्रभात रस्ता, पुणे - ४११ ००४.

मिळण्यासाठी त्यांना तसे झगडावेच लागले होते. दीर्घकाळ शालेय पातळीवर काम करावे लागले होते. परंतु १९५६ नंतर त्यांनी एक अखंड ज्ञानयज्ञानाचा जणू प्रारंभ केला होता. कोणत्याही कामात मनाने खोल उतरण्याचा त्यांचा स्वभाव होता. मेहनतीवृत्ती होती. अध्यापनात कळकळ होती. हे सारे बळ त्यांच्या लेखनात, समीक्षावृत्तीतही उतरले आहे.

डॉ. व. दि. कुलकर्णी यांनी प्रथम शास्त्रशाखा निवडली होती. याकडे केवळ योगायोग



अनुक्रमणिका







म्हणून बघता येत नाही. त्यांच्या समीक्षावृत्तीला जी पायाभूत बैठक आहे; ती या शास्त्रशाखेच्या अध्ययनाने प्राप्त झाली आहे. कोणत्याही ज्ञानाचे वर्गीकरण, व्यवस्थापन, नियमन, स्वतंत्र ज्ञानाचे संकल्पन आणि नेमके टोकदार विवेचन हे शास्त्रीय विचारांचे जे सूत्र आहे, ते त्यांच्या विचारांना पायाभूत चौकटीप्रमाणे प्राप्त झाले आहे. त्यांचे पहिले पुस्तक सुद्धा 'गॅलिलिओ'चे छोटेसे चरित्र सांगणारे आहे. स्वाध्यायमालेसाठी त्यांनी हे पुस्तक लिहिले होते. त्यांचे पहिले नाते शास्त्रशाखेशी जुळत होते, याची साक्ष देणारे हे पुस्तक आहे.

रँगलर ग. स. महाजनी त्यांना शिकवायला होते. त्यांच्या अध्यापनात गणिताच्या तत्त्वज्ञानाची बैठक होती. त्यामध्ये कोरडेपणा नव्हता. हाच वसा सरांना मिळाला होता. शास्त्रशाखेचे अंगण ओलांडून कलाशाखेकडे त्यांनी प्रवेश केला. प्रा. रा. श्री. जोग, डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे, प्रा. श्री. के. क्षीरसागर यांचे अध्यापन, आणि समीक्षादृष्टी यांचा प्रभाव त्यांच्या समीक्षा विचारांवर निश्चित आहे. एकीकडे प्रा. रा. श्री. जोग तर्कसंगत साहित्यविचार मांडत होते. 'अभिनव काव्यप्रकाश'च्या रूपाने मराठीच्या साहित्य विचारांचा पाया घालण्याचे कार्य ते करीत होते. साहित्याला स्वतंत्र तात्त्विक विचारांचे अधिष्ठान असणे आवश्यक आहे. याची जाणीव प्रा. जोग मांडीत होते. दुसरीकडे प्रा. श्री. के. क्षीरसागर काव्याच्या प्रवाहात आस्वादनासाठी खोलवर घुसण्यास सांगत होते. या दोन्हींचा प्रभाव सरांच्या साहित्य विचारांवर व समीक्षावृत्तीवर निश्चितपणे पडत होता. शास्त्रशाखेचे वर्गीकरण व्यवस्थापनाचे सूत्र आणि वाङ्मय आस्वादातील कलात्मक जोपासना यांचे एक उत्कृष्ट संयुग त्यांच्या समीक्षावृत्तीत प्रारंभापासूनच आपोआप निर्माण होत गेले होते.

डॉ. व. दि. कुलकर्णी आणि त्यांचे समकालीन मराठीचे अभ्यासक यांच्या संदर्भात एक गोष्ट तीव्रतेने जाणवते ती म्हणजे त्यांच्या वाङ्मयीन दृष्टिकोनामध्ये नव्या व जुन्या वाङ्मयीन संकल्पनांचा एक मनोज्ञ संगम आहे. ज्या वाङ्मयीन पर्यावरणामध्ये या पिढीतील लोकांची वाङ्मयीन दृष्टी विकसित होत होती तो काळ वाङ्मयीन अभिसरणाचा, तात्त्विक संकल्पनांच्या मंथनाचा काळ होता. जीवनाच्या सर्व क्षेत्रातच जुनी कात टाकून नवीन युगाकडे झेपावण्याची प्रवृत्ती विकसित होत होती. प्रयोजनवादी, वाङ्मयीन जाणीव नाहिशी होऊन नवीन कलात्मक जाणीव रुजत होती. या प्रक्रियेतून जाण्याच्या काळात सरांची वाढ झालेली होती. त्यामुळे जुनी संस्कृत साहित्यशास्त्राची बैठक, त्या आधारे प्रा. रा. श्री. जोगांनी सिद्ध केलेले मराठीचे 'अभिनव काव्यप्रकाश' यांचा प्रभाव होता. ग. त्र्यं. देशपांडे यांच्या कार्यातून संस्कृत साहित्यशास्त्राची पुन्हा मांडणी होत होती. त्याच वेळेला मर्ढेकरांचे 'वाङ्मयीन महत्त्मता', 'सौंदर्यशास्त्र', 'लयतत्त्व' या नवीन संकल्पना साहित्यक्षेत्रात नवे वारे उठवत होत्या. सरांची साहित्यदृष्टी जुन्या संकल्पनांना नवा उजाळा देत नव्या कल्पनांना सन्मुख राहणारी आहे. जी प्रक्रिया वाङ्मयक्षेत्र, वाङ्मयव्यवहार आणि साहित्य विचारांच्या संदर्भात घडत होती, त्यातून सरांची नव्या-जुन्याचा समन्वय साधणारी वाङ्मयीन दृष्टी निर्माण झाली होती. ही दृष्टी घडण्यामध्ये त्यांचे वाचन, व्यासंग नुसता नव्हता तर जुन्या व नव्या पिढीशी त्यांचे संवाद होत होते. जुन्या पिढीतील माणसे तर होतीच; परंतु नवीन वाङ्मयीन संकल्पनांचा हिरिरीने पुरस्कार

करणारे प्रा. दि. के. बेडेकर, प्रभाकर पाध्ये, पु. शि. रेगे, द. ग. गोडसे यांच्याबरोबर सततची चर्चा होत होती. खानोलकर, जयवंत दळवी, बोरकर, गो. नी. दांडेकर यांच्यासारख्या नव्या पिढीतील कलावंतांबरोबर होणाऱ्या वाङ्मयीन चर्चेतून सरांच्या साहित्य, समीक्षा, कलात्मकता या विषयीच्या कल्पना आणि त्यांची भूमिका सिद्ध होत होती. 'धुळाक्षरातून मुळाक्षराकडे' या आपल्या आत्मचरित्राच्या दुसऱ्या भागात त्यांनी या विषयी उत्कृष्ट विवेचन केले आहे.

डॉ. व. दि. कुलकर्णी यांच्या कलात्मक निकषांप्रमाणे कोणत्याही कलाकृतीचे काही घटक तिच्यामध्ये एक कलाकृती म्हणून महत्त्वाचे ठरतात. कलाकृतीचे रूप, तिचा आकृतिबंध त्याचे धारदारपण त्यांना महत्त्वाचे वाटते. त्या कलाकृतीतील अनुभव, त्यातील कलात्मक सत्त्वांची तीव्रता त्यांना महत्त्वाची वाटते. याचे कारण त्यातूनच कलाकृतीत आस्वादक निर्माण होत असते. ही आस्वादकता त्यांना दोन्ही दृष्टीने महत्त्वाची वाटते. एक म्हणजे कोणत्याही कलेत आस्वादकता असणे महत्त्वाचे असते. हा आस्वाद घेत असताना रसिकांच्या मनात जी संवेदना निर्माण होते, ती संवेदना म्हणजे निर्माण होणारा 'विशिष्ट रस' असतो. हा रस केवळ साहित्याच्या आस्वादात नाही तर सर्वच कलांना लागू आहे. ही त्यांची कलात्मकदृष्टी आहे.

*नियतकालिक आणि वाङ्मयेतिहासलेखन.*

*''एखाद्या भाषेतील वाङ्मयेतिहास लिहिणाऱ्या वाङ्मयेतिहासकाराला तत्कालीन साहित्यसंस्था, प्रकाशनसंस्था, वाङ्मयचर्चामंडळे, ललितमंडळे, साहित्यसंमेलने, शैक्षणिक ध्येये व धोरणे, विद्यालयीन आणि वाङ्मयीन विषयांचे अभ्यासक्रम, सरकारी ग्रंथयोजना, वाङ्मयीन वादंगे, सामाजिक-राजकीय-सांस्कृतिक आंदोलने इत्यादींचा विचार करावयास हवा. कलादृष्ट्या साहित्याच्या अंतिम मूल्यमापनास या विषयांची आवश्यकता नसते हे खरे. पण साहित्याच्या निर्मितीत, त्याच्या विकासात आणि प्रचारात या गोष्टींचा मोठा वाटा असतो. म्हणून वाङ्मयेतिहासकाराला यावर सारखी दृष्टी ठेवून बसणे भाग असते. दैनिके, साप्ताहिके, पाक्षिके, मासिके, वार्षिके या साहित्यक्षेत्रीय चळवळींचा यथायोग्य परामर्श घेत असतात. भाषा व वाङ्मय यांच्या दैनंदिन व्यवहाराचा चालता-बोलता, मूळ रंगरूपातला अकृत्रिम असा ठसा, त्याच्या जिवंत रूपात, दैनिके व नियतकालिके यांच्या इतका प्रभावीपणे अन्यत्र पाहावयास मिळत नाही. ऐतिहासिक कागदपत्रे आणि इतिहास यांचा जो स्वरूपसंबंध, तोच नियतकालिके आणि वाङ्मयेतिहास यांचा स्वरूपसंबंध होय. यासाठी नियतकालिकांच्याकडे वाङ्मयेतिहाची महत्त्वपूर्ण, आनुषांगिक साधने म्हणून जाणीवपूर्वक पाहावयास हवे. त्यांच्या अभ्यासाने एका विशिष्ट कालखंडातील विविध घरातील लेखक, वाचक, टीकाकार, सरकार आणि समाज यांची वाङ्मयीन धारणा व ध्येये, प्रेरणा व प्रमेये यांचा व्यापक आलेख येतो.''*

*(मराठी नियतकालिकांचा वाङ्मयीन अभ्यास : खंड - १*
*१८३२-१८८२ - संपा. व. दि. कुलकर्णी : पृ : १०)*

## प्रा. डॉ. व. दि. कुलकर्णी : वाङ्मय-सूची

### ग्रंथलेखन

१. गॅलिलिओ : अ. वि. गृह प्रकाशन, पुणे २, पृ. १८; प्रथमावृत्ती - १९४८
२. लीळाचरित्र : एक अभ्यास : व्हीनस प्रकाशन, पुणे - ३०, पृ. ११६, प्रथमावृत्ती - एप्रिल १९६७; दुसरी आवृत्ती -जानेवारी १९७८
३. चक्रधरस्वामी यांचे मोकळे दृष्टांत (संहिता आणि समीक्षा) : व्हीनस प्रकाशन, पुणे ३०; प्रथमावृत्ती मार्च १९७०, पृ. २०
४. केशवसुतांचे अंतरंग : नितीन प्रकाशन, पुणे ३०, पृ. १००; प्रथमावृत्ती - ४ एप्रिल १९७३
५. संगीत सौभद्र : घटना आणि स्वरूप : व्हीनस प्रकाशन, पुणे ३०, प्रथमावृत्ती - १५ ऑगस्ट १९७४, पृ. ३५२
६. अर्वाचीन मराठी सारस्वतकार : मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई, प्रथमावृत्ती - मे १९७५, पृ. १५६
७. साहित्य : रूप आणि गंध : मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई, प्रथमावृत्ती १४ जानेवारी, १९७६, पृ. १४८
८. ज्ञानेश्वर : काव्य आणि काव्यविचार : मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई, प्रथमावृत्ती, विजयादशमी, १९७७, पृ. १३२
९. संत साहित्याची संकल्पना : म. सा. प. आंध्र प्रदेश, प्रथमावृत्ती - १९८९, पृ. ७२
१०. आज्ञार्थी गीता : प्रवोधन रिसर्च असोसिएशन, मुंबई, प्रथमावृत्ती १३ ऑगस्ट १९९०, पृ. ७२
११. पसायदान : सोऽहम् प्रकाशन, पुणे, प्रथमावृत्ती - मार्च १९९१, पृ. १००, द्वितीय आवृत्ती - डिसेंबर १९९५, पृ. ८५
१२. श्री ज्ञानेश्वर : तत्त्वज्ञ, संत आणि कवी : के. भि. ढवळे, मुंबई, प्रथमावृत्ती - ५ मार्च, १९९३, पृ. ८०
१३. ज्ञानेश्वरांचे काव्यशास्त्र : स्नेहवर्धन पब्लिशिंग हाऊस, पुणे, प्रथमावृत्ती - मार्च १९९३, पृ. ११२
१४. संत सारस्वत : आकलन आणि आस्वाद : मुंबई विद्यापीठ/अनुभव पब्लिकेशन्स्, मुंबई, प्रथमावृत्ती - ११ एप्रिल १९९४, पृ. १४८
१५. मृत्युंजय सावरकर (छायानाट्य संहिता) प्र. सावरकर दर्शन-प्रतिष्ठान, ठाणे, १९९२, पृ. ६५ ते ८१

### संपादन

१. संगीत संशयकल्लोळ : व्हीनस प्रकाशन, पुणे, प्रथमावृत्ती - जून १९७०, पृ. ६४+९२
२. श्री गोविंदप्रभुचरित्र : व्हीनस प्रकाशन, पुणे, प्रथमावृत्ती - जानेवारी १९८०, पृ. १००

३. साहित्यचिंतन : मराठी विभाग, मुंबई विद्यापीठ, प्रथमावृत्ती - नोव्हेंबर १९९३, पृ. ११०
४. मराठी नियतकालिकांचा वाङ्मयीन अभ्यास - खंड १ : १८३२ ते १८८२ : मराठी विभाग, मुंबई विद्यापीठ, श्रीविद्या प्रकाशन, पुणे, प्रथमावृत्ती - १८ फेब्रुवारी १९८७, पृ. १३६
५. निवडक श्री. के. क्षीरसागर : साहित्य अकादमी; अनुनय प्रकाशन, मुंबई, प्रथमावृत्ती - १९९३, पृ. २३४
६. अस्तित्ववादाची ओळख : (दि. के. वेडेकर) : जनता केंद्र, ताडदेव, मुंबई.
७. दरवाज्यावरील प्रवेश अथवा फार्स फुकट्या प्रेक्षकांचा - ले. रा. ग. गडकरी, (रंगभूमी नियतकालिक) प्र. हंस, मार्च १९८६

## सहसंपादन

१. मराठी कविता : प्राचीन कालखंड (११५०ते १८४०)
सहसंपादन - वा. रा. ढवळे, मुं. म. साहित्य संघ; प्रथमावृत्ती १९६९, पृ. २३२
२. एकांकिका वाटचाल : सहसंपादक - प्रा. श्री. र. भिडे/प्रा. भालबा केळकर; सोमैया पब्लिकेशन्स् प्रा. लि. मुंबई, प्रथमावृत्ती - १९६९, पृ. ३३२
३. आख्यानक कविता : सहसंपादक - गं. ब. ग्रामोपाध्ये / शंकर वैद्य; मुंबई विश्वविद्यालय, प्रथमावृत्ती - १९९३, पृ. १६८
४. अप्रकाशित तांबे : सहसंपादक जयंत वष्ट, मुंबई विश्वविद्यापीठ, प्रथमावृत्ती - १९७४, पृ. १०४
५. कविता फुलते अशी : सहसंपादक - वा. रा ढवळे, ओरिएंट लाँगमन लिमिटेड, प्रथमावृत्ती - १९७५; पृ. ६७
६. अज्ञात लीळा : सहसंपादक - पु. चं. नागपुरे, व्हीनस प्रकाशन, पुणे ३०, प्रथमावृत्ती - मे १९८६, पृ. ९९
७. विज्ञान : साहित्य आणि संकल्पना, सहसंपादक - निरंजन घाटे, नीहारा प्रकाशन, प्रथमावृत्ती - ऑक्टोबर १९९०, पृ. १३१
८. मराठी वाङ्मयाचा इतिहास-खंड ६, भाग १ व २ : सहसंपादक-प्रा. गो. म. कुलकर्णी, म. सा. प. पुणे, प्रथमावृत्ती-२७ मे १९९१, पृ. ४६४
९. कथाविहार : भाग १, २, ३ : सहसंपादक - डॉ. वा. भा. पाठक, केदार प्रकाशन, पुणे.

## नियतकालिकांचे संपादन

१. उत्तम : वार्षिक दिवाळी अंक - १९६९ सहकार्याने (वा. रा. ढवळे यांच्यावरोबर) १९७०, १९७१)
२. श्री गुरुसेवा (त्रैमासिक) श्री दत्तदेवस्थान, वेदांतनगर, अहमदनगर, १९९४ सालापासून चालू.










म्हणूनच सरांच्या वाङ्मयीन भूमिकेमध्ये कोणत्याही एकाच विचारसरणीचा प्रभाव जाणवत नाही. साहित्याच्या सर्वांगीण आकलनाच्या दृष्टीने कोणत्याही एका विचारसरणीविषयी आग्रही असणे त्यांना योग्य वाटत नाही. योग्य आकलनासाठी योग्य त्या समीक्षा पद्धतीचा उपयोग करावा. अमुक एकच महत्त्वाची अशी भूमिका ते ठेवताना दिसत नाहीत.

कलाकृतीच्या अंतिम आकलनाच्या तादाम्यतेच्या क्षणी रसिक व काव्य यांची भेट होते. त्याक्षणी येणारी अनुभूती ही महत्त्वाची ठरते. या क्षणी रसिक व कला एकजीव होतात. या ठिकाणी येणारी जाणीव अधिक भावात्मक असते. ही सरांची दृष्टी असल्याने त्यांच्या वाङ्मयीन भूमिकेत किंवा विवेचनात कुठेही आग्रही वृत्ती दिसत नाही. अनाग्रही वृत्ती असूनही आपल्या विचारांची तत्त्वाची निश्चितता, ठामपणा असणारी त्यांची वाङ्मयीन दृष्टी आहे, असे दिसून येते. कुठेही प्रहार करण्याची वृत्तीच नाही.

कलात्मकतेचा शोध घेताना, आस्वादाच्या स्वतंत्रमार्गाने जाऊन त्यांनी प्रत्येक ठिकाणी शोध घेतला आहे. आपल्या आत्मप्रत्ययाला प्रमाण मानून सर्व समीक्षात्मक लेखन केले आहे. रसिक, अभ्यासक, संशोधक, आस्वादक या भूमिकांमधून नव्या-जुन्या साहित्याला भिडताना त्यांना जे प्रतित झाले, जे भावले जसे दिसले ते तसेच्या तसे वाचकांपर्यंत पोचवण्याची त्यांची वृत्ती आहे. हा त्यांच्या समीक्षावृत्तीचा आत्मा आहे. असे स्पष्टपणे दिसून येते. प्रतिपादनासाठी स्वीकारलेला विषय मग केशवसुतांची कविता असो की 'तृणाचे पाते' या कवितेचे किंवा 'कोंबडा' या कथेचे रसग्रहण असो, प्रत्येक ठिकाणी त्यांची हीच वृत्ती आणि दृष्टी दिसून येते.

या प्रक्रियेतून घडलेल्या सरांच्या समीक्षावृत्ती व दृष्टीविषयी एकंदरीत असे म्हणता येईल की, वर्गीकरण, व्यवस्थापन आणि टोकदार विवेचन करणे, एखाद्या विषयावर विविध बाजूंनी विचारांचे झोत पाडून त्यांचे सर्वांगीण रूप विचारात घेणे, कलात्मक निर्मिती म्हणून प्रत्येक साहित्यकृतीचे स्वतंत्र रूप तपासणे ही त्यांची समीक्षादृष्टी आहे. त्यांच्या वाङ्मयीन अभ्यासाला या सूत्रांची चौकट आहे. परंतु ही त्यांच्या समीक्षेची प्रकृती नाही. प्रकृती मात्र आस्वादकतेची आहे; कलाकृतीच्या गाभ्याचा वेध घेणारी आहे. शब्दार्थांचे, प्रतीक-प्रतिमांचे पदर तोलीत कलेचा आस्वाद घेत त्याचे अंतरंग जाणून घेणारी आहे. रसिकता हा या समीक्षेचा स्थायीभाव आहे. संतसाहित्याविषयी त्यांच्या मनात एक ओढ आहे. संतपरंपरेविषयी आदर, श्रद्धा त्यांच्या मनात आहे. संतवाङ्मयाचा अभ्यास करताना ही श्रद्धा, भक्ती संत सारस्वतापाशी नम्र होण्याची वृत्ती, शांतरसाच्या डोहात उतरण्याची त्यांची वृत्ती प्रबळ होताना दिसते.

डॉ. व. दि. कुलकर्णी यांच्या विविध प्रकारच्या लेखनात या समीक्षा दृष्टीचे आणि वृत्तीचे प्रतिबिंब विषयानुसार पडलेले दिसते. काही ठिकाणी या भूमिकेचा एकत्रित प्रत्यय येतो.

'सौभद्र घटना व स्वरूप', 'लीळाचरित्र : एक अभ्यास' ही पुस्तके त्यांच्या अभ्यासदृष्टीची साक्ष देणारी आहेत. त्यांची स्वतंत्र, चिकित्सक अभ्यासकाची, संशोधकाची दृष्टी कशी होती, ते या दोन ग्रंथांमध्ये स्पष्टपणे दिसून येते. साहित्याच्या संशोधनाची एक शिस्तपूर्ण अभ्यासपद्धती त्यांनी सिद्ध केली आहे. ती त्यांची संशोधनपद्धती कशी होती, याचे स्वच्छ चित्र या पुस्तकांमध्ये बघायला मिळते.

'लीळाचरित्र' हा ग्रंथ स्मरणभक्तीचे प्रतीक कसा आहे, या खंडाचे एकांक, पूर्वार्ध, उत्तरार्ध असे त्रिखंडात्मक रूप कसे आहे, या ग्रंथाच्या वाङ्मयीन रूपात निवेदनाच्या दृष्टीने किती प्रकार दिसून येतात; जे जसे घडले तसे कथन करण्याची, वस्तुस्थितीचं निवेदन करण्याची प्रेरणा या लीळांमागे आहे. त्यामध्ये वृत्तलेखनात्मक, प्रसंगचित्रणात्मक, कथाकथनात्मक, तत्त्वनिरूपणात्मक असे वर्गीकरण करून त्याचे स्वतंत्रविवेचन ते करतात. त्यानंतर 'लीळाचरित्रा'च्या भाषिक अभ्यासाकडे ते वळतात. या ग्रंथाची भाषाशैली, वाक्यरचना कशी आहे, याचे विवेचन ते करतात. त्यातून यादवकालीन मराठी गद्यलेखनाचे स्वरूप कसे आहे, मिश्र आणि संयुक्त वाक्यांचे स्वरूप कसे दिसून येते याचे ते सप्रमाण विवेचन करतात.

'लीळा' ही संज्ञा या लेखनाला का वापरली आहे. 'एथ' या शब्दाचा उपयोग वारंवार का होतो, या संबंधी विवेचनापर्यंत ते खोल शिरताना दिसतात. इतकेच नव्हे तर लक्ष्मीबाई टिळक यांचे आत्मचरित्र 'स्मृतिचित्रे' आणि 'लीळाचरित्र' यामध्ये त्यांना काही समानसुत्रे आढळतात. त्याचाही तौलानिक विचार त्यांनी केला आहे.

महानुभावी साहित्य, श्री चक्रधरांचे व्यक्तिमत्त्व यांच्या विषयी त्यांच्या मनात आदर आहे. ती आत्मीयता लेखनातून जाणवत राहते. एका ग्रंथाला किती बाजूंनी भिडता येते, त्याचे सर्वांगीण भान वाचकांना कसे देता येते, याचे उत्तम उदा. 'लीळाचरित्र : एक अभ्यास' हे पुस्तक आहे. मर्यादित पृष्ठसंख्येमध्ये लीळाचरित्राचे आंतरिक व बाह्य दर्शन सरांनी घडवले आहे. 'लीळाचरित्र : एक अभ्यास' प्रमाणेच 'सौभद्र : घटना व स्वरूप' या सरांच्या संशोधन ग्रंथाचे स्वरूपही असेच बघता येईल. हा ग्रंथ म्हणजे त्यांचे पीएच्. डी.चे संशोधन आहे.

***विज्ञान साहित्य : संकल्पना आणि समज.***

*''सर्जनशील साहित्य म्हणजे काय हे ध्यानी घेतल्यास विज्ञान साहित्य म्हणजे काय, हे सांगणे सोपे होणार आहे. विज्ञानसाहित्य म्हणजे विज्ञानातील एखादे वास्तव सत्य, त्यातून निर्माण होणारी, कलात्मक कल्पनेच्या स्तरावरील नवनिर्मिती होय. संभवनीयता आणि शक्यता यांच्या मर्यादेत येथे कल्पित वावरत असते. निसर्ग, पशु, पक्षी आणि मानव यांच्यातील नवनवीन भावनिक नाती येथे जन्माला येतात. एका वेगळ्या नव्या लौकिकेतर सृष्टीत आपण जातो. ही सृष्टी आणि तिच्यातील भावनिक आणि भावगर्भ-वैचारिक नाती यातून एक कलात्मक आकृतिबंध निर्माण होतो. हा आकृतिबंध आपणास विलक्षण सौंदर्यानंद देऊ शकतो. हा आनंद देणे हेच विज्ञानसाहित्याचे अंतीम प्रयोजन ठरते. कोणत्याही साहित्यकृतीचे हेच अंतीम प्रयोजन असते. विज्ञान साहित्यकृती ही अन्य साहित्यकृती प्रमाणे स्वत: 'साध्यरूपच' असायला हवी; ती साधनरूपाने येणे गौणत्वाचे लक्षण ठरेल.''*

*(विज्ञान साहित्य आणि संकल्पना : संपा. डॉ. व. दि. कुलकर्णी, निरंजन घाटे पृष्ठ : ८६*











वाङ्मयीन संशोधनाच्या सर्व पद्धतींचा या ठिकाणी त्यांनी उपयोग केला आहे. केवळ एका कलाकृतीचे अनेक मार्गांनी संशोधन कसे करता येते, याचा एक वस्तुपाठ सरांनी या संशोधनातून घालून दिला आहे.

'संगीत सौभद्र' हे अण्णासाहेब किर्लोस्कर यांचे दुसरे नाटक आहे. परंतु त्यांच्या पहिल्या 'शाकुंतल' या नाटकापेक्षा 'संगीत सौभद्र' हे नाटक अधिक लोकप्रिय झाले. संगीत नाटकाचा एक घाटच सौभद्रने सिद्ध केला. मराठी नाट्यसृष्टीत संगीत नाटकांची एक परंपरा या नाटकाने सुरू केली होती. त्यामुळे 'संगीत सौभद्र' हे नाटक स्वत:मध्ये अभ्यासाच्या व संशोधनाच्या विविध दिशा सामावून घेणारे नाटक ठरले होते. सरांनी या संशोधनाचे सरळ दोन भाग केले आहेत. सौभद्रची घटना आणि नाटकाचे स्वरूप या दोन भागांमध्ये अनेक उपविभाग त्यांनी पाडले आहेत.

'संगीत सौभद्र' या नाटकाचे कथानक पौराणिक आहे. अर्जुन व सुभद्रा यांच्या विवाहाची कथा महाभारतात येते. हा कथाभाग लोकप्रिय आहे. अनेक आख्यानक काव्येही या कथानकावर आधारित आहेत. परंतु या कथानकाचे जे स्वरूप या नाटकात दिसते, त्याचे मूळ महाभारतात आहे. महाभारतातून भागवत, त्यातून अनेक पंडित कवींच्या रचना या मार्गाने हे कथानक कसा प्रवास करीत आले, याचा चिकित्सक शोध सरांनी घेतला आहे. या प्रवासात मूळ महाभारतातील कथेत कोणते बदल होत आले, तंजावरी नाटकांमध्ये याचे स्वरूप कोणते होते, याचा तौलानिक विचार ते करतात. याचे कारण अण्णासाहेब किर्लोस्कर बेळगावचे होते. तंजावरी नाटकांचा त्यांना परिचय होताच; त्यामुळे कानडी नाटके कोणती आहेत, यांचाही शोध त्यांनी घेतला आहे. कीर्तन परंपरेतून ही कथा कशी आली आहे. थोडक्यात म्हणजे सौभद्रच्या कथानकाचे मूळ आणि त्यामध्ये कालानुक्रमे होत जाणारे बदल यांचा ऐतिहासिक विस्तृत आढावाच त्यांनी घेतला आहे.

अण्णासाहेबांनी प्रत्यक्ष नाटक लिहिताना त्यांच्यापर्यंत आलेले कथानक जसेच्या तसे स्वीकारले का? त्यामध्ये कोणते वदल केले? अखेर या कथानकाला अण्णासाहेवांनी कोणते रूप दिले याची चिकित्सा ते करतात. भक्तिमार्ग आणि पारमार्थिक विचारांपासून त्यांनी या नाटकाला दूर ठेवले. देवादिकांवरोवर ती मानवाचीही कुटुंबकथा बनवली. कृष्णाला सूत्रधार बनवून सौभद्रच्या संविधानकात अण्णासाहेबांनी एकसूत्रतता निर्माण केली. त्यामुळे 'अण्णासाहेबांची सौभद्र-कथा ही महाभारतातल्या सारखी वीरकथा किंवा कामकथा राहत नाही तर ती एक रम्य प्रीतिकथा वनते.' असा निष्कर्ष ते अंती काढतात.

या घटनात्मक चिकित्सेकडून सर 'सौभद्र'च्या स्वरूपाकडे वळतात. संस्कृत नाटकाचे रचनातंत्र स्वीकारणाऱ्या या नाटकाच्या संविधान रचनेचा अंकानुसार विचार करतात.

संस्कृत नाट्यरचनेचा मार्ग किर्लोस्करांनी निवडला तरी त्यांच्याभोवती असणाऱ्या नाटकांची वेगवेगळी रूपे कोणती होती, कीर्तनाख्यान, विष्णुदासी नाटकांनी घडवलेला आकृतिबंध, मुंबईतील पारशी ऑपेरा, इंग्रजी म्युझिकल फार्स यांचे काही अंश सौभद्रमध्ये दिसतात का? याचा शोध त्यांनी घेतला आहे. सर्वात महत्त्वाचे म्हणजे सौभ्रदचे संगीत आहे. नाटकामध्ये

हे संगीत कुठून आले, विष्णुदास भावे यांच्या 'सीतास्वयंवर' नाटकातील संगीताचे स्वरूप व नाटकातील त्याचे प्रयोजन कोणते होते? नाटकातील संगीत हे नाटकाला पोषक असणे आवश्यक आहे. त्या दृष्टीने किर्लोस्करांनी स्वतंत्र दृष्टी कोणती ठेवली होती? ललित स्वरूपाचे संगीत किर्लोस्करांनी सौभद्रमध्ये आणले. त्यातून संगीत आणि नाटक याचे बेमालूम रसायन त्यांनी साधले. त्यानेच 'संगीत हा सौभद्रचा प्राण ठरला' या तात्पर्याप्रत ते येऊन पोचतात. या संशोधनाचा उत्तरभाग जणू परिशिष्ट म्हणून ते सौभद्रवरील टीकेचा स्वतंत्र परामर्श घेतात. १८ नोव्हेंबर १८८२ ला 'संगीत सौभद्र' या नाटकाचा पहिला प्रयोग झाला. तेव्हापासून १९७० पर्यंत या लोकप्रिय नाटकाची समीक्षा कशी झाली, याचा समग्र कालानुक्रमे पटच ते उभा करतात. १८८२ ते १८८५, १९०० ते १९१०, १९३० ते १९५० आणि १९६० ते १९७० असे खंड त्यांनी पाडले आहेत. या प्रत्येक खंडात या नाटकाची समीक्षा कशी झाली, मराठीचा साहित्य विचार, समीक्षादृष्टी आणि त्याचबरोबर नाट्यविषयक संकल्पना जसजशा विकसित होत गेल्या, उत्क्रांत होत गेल्या त्यानुसार सौभद्रच्या समीक्षेतही कसा फरक पडत गेला, याचा एक पटच सरांनी 'गेल्या नव्वद वर्षातील 'संगीत सौभद्र' वरील टीकेचा परामर्श' या पुस्तकात घेतला आहे. २१ नोव्हेंबर १८८२ ला 'केसरी'मध्ये 'सौभद्र' नाटकाचे परीक्षण आले होते.

***एकांकिकेचे जीवननाट्यदर्शनाचे सामर्थ्य !***

*''एकांकिकेचा देह जरी लहान असला तरी तिचा जीव अगदीच चिमुकला आहे आणि तिने व्यापलेले जीवनानुभूतीचे क्षेत्र संकुचित आहे, असे मानायचे काही कारण नाही. जीवनातल्या कितीतरी अनुभूतींतील अर्थपूर्णता नव्याने अशी एकांकिकांनीच आविष्कृत केली आहे. उत्कटतेने आणि आवेगाने, अल्पावकाशात अत्यंत प्रभावीपणाने व्यक्त करण्यासारखे कितीतरी भावोद्रेक असतात. मोठ्या नाटकापेक्षा एकांकिकेमध्येच हे भावोद्रेक पूर्णांशाने यथातथ्यपणे प्रकट करता येतात. एकांकिकेने असे कितीतरी सूक्ष्म, खोल, तीव्र, जटिल, क्लिष्ट, लवचिक, गूढ, स्वप्निल, भावोत्कट क्षण टिपले आहेत आणि जीवनचैतन्याचे प्रामाणिक स्पंदन उरी बाळगले आहे. तसेच एकांकिकांनी विनोद, उपरोध, उपहास-परिहासांबरोबरच विशाल, भव्य, विराट अशा मुलभूत समस्या आणि प्रश्नही उपस्थित करण्याची जिद्द दाखवली आहे. एकांकिका दिसायला लहान असली तरी ती प्रसंगी महान होऊ शकते. ती इतकी समर्थ बनू शकते की आपल्या जीवनबिंदूत अनुभूतीचा सागर कोंडू शकते. दैनंदिन जीवनातील छोट्या छोट्या अनुभूतींपासून ते विश्वात्मक सनातन प्रश्नांपर्यंत एकांकिकेतील जीवनदर्शनाचे क्षेत्र आज पसरलेले आढळते. एकेक एकांकिका उत्कटपणे एकेका अर्थपूर्ण जीवनानुभूतीला अनन्यसाधारण कलारूप देत राहते. तिला कोणताही विषय वर्ज्य नाही.''*

*(एकांकिका वाटचाल : संपा. डॉ. व. दि. कुलकर्णी व इतर : पृष्ठ १४०)*



अनुक्रमणिका







येथपासून या समीक्षेचा आढावा सुरू होतो. १९७३ ला मराठी वाङ्मयाच्या इतिहासाचा ५ वा खंड प्रसिद्ध झाला. त्यामध्ये के. नारायण काळे यांनी नाट्यवाङ्मयाचा आढावा घेताना संगीत सौभद्रचा कोणता विचार केला आहे, येथपर्यंत हा आढावा येऊन थांबतो. या नव्वद वर्षांच्या समीक्षेत 'सौभद्र' नाटकाच्या समीक्षेमध्ये अभ्यासकांनी कोणते प्रश्न उपस्थित केले, याचा सूत्रमय विचारही त्यांनी शेवटी केला आहे.

डॉ. व. दि. कुलकणी यांनी संपादित केलेल्या पुढील ग्रंथांमध्येही ही वृत्ती दिसून येते. संपादित ग्रंथामागील हेतू, प्रयोजन, सुस्पष्ट स्वरूपात त्यांनी स्वीकारलेले असते. स्वीकृत विषयाचे वैशिष्ट्य, अंतरंग आणि कालानुक्रमे त्याचा विकास सिद्ध करण्याची त्यांची भूमिका असते. आपल्या विवेचक प्रस्तावनांमधून ते त्या विषयाचे तात्त्विक रूपच मांडतात. प्राचीन मराठी कवितेचा विचार करताना त्यांना प्राचीन मराठी कवितेत रचनेच्या दृष्टीने अनेक स्वतंत्र घाट दिसून येतात. साहित्यप्रकार म्हणून असणारे त्यांचे रूप स्पष्ट व्हावे; विषय, अभिव्यक्तीची शैली स्पष्ट व्हावी, त्यातून प्राचीन मराठी कवितेचा व्यापक पट सिद्ध व्हावा हा विचार त्यांना महत्त्वाचा वाटतो. 'मराठी कविता : प्राचीन कालखंड' ११५० ते १८४० या ग्रंथाच्या प्रस्तावनेत त्यांनी संपादनामागील भूमिका स्पष्ट केली आहे.

''प्राचीन मराठी कवितेचे प्रधान रूपप्रकार, स्थल, काल, व्यक्तिपरत्वे त्यामध्ये होणारे बदल, त्यामागील काव्यविषयक जाणिवा आणि त्या त्या काळातील वाङ्मयाभिरूची यांचे निदर्शन होईल असे नेमके आणि मोजके काव्यखंड, रसिक अभ्यासकांच्या हाती द्यावेत असा निर्णय घेऊन त्याप्रमाणे प्रस्तुत कविता संग्रहाचे संपादन करण्यात आले आहे.'' (पृ. ५)

भाष्यकाव्य, कथाकाव्य आणि भावकाव्य अशा तीन विभागांमध्ये प्राचीन मराठी कवितेचे त्यांनी वर्गीकरण केल आहे. आद्य मराठी कवी मुकुंदराजांपासून शिवकालीन शाहीर परशुराम, गंगू हैवती, आलाकुमर यांच्या 'श्रीचक्रधरांची शेजारती' पर्यंत प्रातिनिधिक काव्याची त्यांनी निवड केली आहे. प्राचीन मराठी कवितेचा शिवकालापर्यंत वाहत्, विकसित होत येणाऱ्या प्रवाहालाच या संग्रहात त्यांनी सामावून घेतले आहे. परिशिष्टात या सर्व संत कवींचा परिचय दिला आहे. संस्कृतपासून बाजूला होऊन प्राचीन मराठी कवितेने स्वत:चे अस्तित्व प्रकट केले होते. संत सारस्वताच्या रूपाने ती विकसित झाली होती. पुढे तिला निराळेच वळण लागले. दीर्घकाळ वाहत येणारा हा प्रवाह काही अनिष्ट वळणे घेत लुप्त कसा झाला, याचे विवेचन त्यांनी प्रस्तावनेत केले आहे —

''यादवकाळातील मराठी कविता ज्या जिद्दीने व ज्या प्रतिज्ञापूर्वकतेने संस्कृत-प्राकृत कवितेपासून फुटून बाहेर पडली व वेगळी झाली, ती तिची जिद्द पुढे पुढे ओसरत गेली. विश्वात्मक अनुभूतीच्या साक्षात्काराने मोहरलेली मराठी कवितेच्या उगमस्थानीची भावकविता हळूहळू लोपत गेली. अरूपाचे रूप करणारे मूळारंभाचे भाष्यकाव्यही आटत गेले आणि उरले ते सांकेतिक कथा काव्य. पेशवाईच्या अंती प्राचीन मराठी कवितेच्या जीवनचक्राचा फेरा पुरा झाला होता. जीवनाच्या वाटचालीत 'अस्ति, जावते, वर्धते, विपरिणमते, अपक्षीयते' या प्रारंभापासून अंतापर्यंतच्या पाच अवस्थांतून प्राचीन मराठी कविता क्रमाक्रमाने गेलेली दिसते.

तिचा अपक्षय अव्वल इंग्रजीत अधिक होत राहिला. आणि केशवसुतांच्या आगे मागे ती केव्हातरी कुठेतरी थांबली ती थांवलीच'' (पृ. ९). प्राचीन मराठी कवितेची वैशिष्ट्ये, तिचा आरंभ, वाटचाल आणि शेवट या ठिकाणी त्यांनी सूत्ररूपाने सांगितलेला आहे. आधुनिक तात्त्विक वाङ्मयीन भूमिकेतून प्राचीन मराठी कवितांचा सरांनी पुनर्विचार येथे केलेला दिसतो. या कवितांचे वेगळेपण कुठे कसे आहे, काव्यरचनेचे किती आकार/घाट या प्रवाहात दिसून येतात, हे हेरून प्राचीन मराठी कवितेची विविध रूपे अधोरेखित केली आहेत. त्यांच्या या विश्लेषक भूमिकेमुळेच त्यांच्या स्वतंत्र ग्रंथांइतकेच त्यांचे संपादित ग्रंथही तितकेच महत्त्वाचे ठरतात.

अभ्यासकाची चिकाटी, संशोधकाची वस्तुनिष्ठता, साक्षेपीवृत्ती यांबरोबर मर्मज्ञ रसिकाची आस्वादकता ही त्यांच्या वाङ्मयीन भूमिकेत असल्यामुळे त्यांच्या या समीक्षा लेखनात कुठेही तर्ककठोरता, रुक्षता येत नाही. भाषेमध्ये कोरडेपणा नाही तसेच अवघडपणाही नाही. विचारांचे

### *लीळाचरित्राचे वाङ्मयीन रूप !*

*''लीळाचरित्र लेखनाचे सौंदर्य त्याच्या साधेपणात आहे. वस्तुत: श्रीचक्रधरांचे महानुभावित्व, त्याचा आचारधर्म, आणि तत्त्वज्ञान अगदी साध्या शब्दात मांडणे ही गोष्ट अवघड आहे, पण ही अवघड गोष्ट लीळाचरित्रामध्ये इतक्या सहजपणे साध्य झालेली आपणास पाहावयास मिळते, की त्याचे आश्चर्य वाटते. पांढऱ्या स्वच्छ, निर्मळ काचेतून सूर्यप्रकाश जसा आपले तेज यत्किंचित न गमावता सहजतेने अविकृतपणे आपणापर्यंत येऊन पोहोचतो, तसेच कसलाही अडथळा न होता, श्रीचक्रधरांचे महानुभवावित्व आपल्या सर्व रंगछटांनिशी या शब्दांतून जसेच्या तसे, आपल्या मन:सृष्टीत प्रवेश करते.*

*'लीळाचरित्र' ही साहित्यनिर्मिती वेगळ्याच जीतीची आहे. तिचा घाट कलाकृतीचा नाही. भक्तीरसाने ओथंबलेले एक सरळ, प्रांजळ असे 'प्रत्यक्ष'च (Fact च) आहे. 'जसे घडले तसे लिहिले' या जातीचे हे कथन एक प्रकारे इतिहासाचीच प्रकृती घेऊन आलेले आहे. कोणताही काव्यहेतू अथवा कलाहेतू मनात न बाळगता लिहिलेल्या या लीळा, आपली स्वत:चीच स्वतंत्र कथनशैली, वर्णनपद्धती, संवादरीती घेऊन आलेल्या आहेत. आठवणी-आठवणींनी गुंफलेले पण एकात्म, एकसंघ झालेले, दैनंदिनीसारखे असूनही दैनंदिनी नसलेले आणि केवळ हकिकतींचे बनलेले असूनही त्याच्या पार गेलेले असे, हे गद्य रूपातले पण जातिवंत रसात्मक साहित्य आहे ! आपला 'आदर्श' आपल्या रूपानेच उभी करणारी पण त्याचे भान नसलेली, विलक्षण अशी साहित्यकृती आहे !''*

*(लीळाचरित्र : एक अभ्यास : डॉ. व. दि. कुलकर्णी पृ. ३१, ३२ व ९४)*










पारदर्शकत्व आहे. सुस्पष्टता आहे. वेळेला काव्यात्मकता आहे आणि सर्वात महत्त्वाचे म्हणजे आकलन सुलभता आहे. भाषाशैलीचे तट फोडत विचारांपर्यंत पोचण्याची गरजच वाटत नाही. आत्मप्रत्ययाची भूमी या सर्वच समीक्षा लेखनाला प्राप्त झाल्याने मन:पूर्वकतेचा स्पर्श या सर्वच लेखनाला प्राप्त झालेला आहे.

डॉ. व. दि. कुलकर्णी यांचे समीक्षालेखन तीन प्रकारांतून सिद्ध झालेले दिसते. एक म्हणजे त्यांचे स्वतंत्र ग्रंथ लेखन आहे. दुसरे म्हणजे त्यांचे संपादित ग्रंथ आहेत. या ग्रंथांना त्यांनी जोडलेल्या प्रस्तावना आहेत. तिसरा विभाग त्यांच्या व्याख्यानमालांचा आहे. व्याख्यानामध्ये ते मनापासून रमतात. 'धुळाक्षराकडून मूळाक्षराकडे' या आत्मकथनात त्यांनी या विषयी लिहिले आहे. ''लिहिणं मला जड जातं, बोलणं मला आनंद देतं. बोलण्यात प्रत्यक्ष संवादसौख्य असतं. मोकळेपणाचा उत्साह असतो. विषय अनेकांगांनी उलगडत जातो. सोपा होतो आणि त्याचबरोबर त्याची महत्ता आणि गहनताही प्रत्ययास येत जाते. सार्वजनिक व्याख्यानं ही आपल्याच अभ्यासाची परीक्षा असते. ही परीक्षा देणं मला सदैव आवडणारं असं कर्म आहे. या मुक्त विद्यापीठाचा मी अखंड स्नातक आहे. मी महाराष्ट्रात आणि महाराष्ट्राबाहेरही अनेक व्याख्यानमाला गुंफल्या. २५-३० तरी अशा व्याख्यानमाला असतील... (पृ. १४०). हे बोलणं तसं मुक्त असतं. श्रोत्यांना विषयाची समज येणं, त्याची गोडी वाटणं, तो आपणही पुढं वाचावा-अभ्यासावा असं जाणवणं, त्यांना काही नवी जाग येऊन त्यासंबंधी उत्साह वाटत राहणं, इतपत जरी आपण करू शकलो तरी तिथं समाधान लाभतं.'' (पृ. १४६) विविध महाविद्यालये सार्वजनिक संस्था, साहित्य संस्था, यांनी आयोजित केलेल्या या व्याख्यानमाला आहेत. यासाठी महाराष्ट्रात त्यांनी सर्वत्र भ्रमंती केली आहे.

या तीन अंगांनी सरांनी केलेल्या समीक्षाकार्याची व्याप्ती मोठी आहे. विषयांची जी विविधता आहे, ती विस्मयचकित करणारी आहे. कोणताही विषय त्यांना वर्ज्य नव्हताच असे दिसते. प्राचीन मराठी कविता, संत साहित्यापासून दलित कवितेपर्यंत तसेच वाङ्मयेतिहासाच्या लेखन संपादनापासून ते विज्ञान साहित्याच्या संकल्पनेपर्यंत त्यांचे समीक्षा कार्य पसरलेले आहे. विविध लेखांची संख्या तर त्यांनाही सांगणे कठीण आहे. असंग्रहित अशा लेखांची संख्या जवळजवळ तीनशेहून अधिक आहे.

त्यांची अनेक पुस्तके पूर्वप्रसिद्ध लेखांचे संग्रह आहेत. उदा. 'साहित्य : रूप आणि गंध!', 'आधुनिक मराठी वाङ्मय सेवक' तरीही किती तरी लेख अद्याप असंग्रहित स्वरूपातच आहेत. काही ग्रंथ त्यांच्या व्याख्यानमालांतून तयार झालेले आहेत. 'संत साहित्य संकल्पना', 'ज्ञानेश्वरांचे काव्यशास्त्र' आदि. तरीही कित्येक व्याख्यानमाला अजून पुस्तक रूपाने प्रसिद्ध होण्याच्या प्रतिक्षेत ध्वनिफितीच्या रूपातच अद्याप आहेत. प्राचीन कविता, नवकविता, नाटक, कथा, समीक्षा, साहित्य तत्त्वविचार, वाङ्मय इतिहास, नियतकालिकांचे कार्य, लक्षणीय कलाकृती अशा विविध विषयांना त्यांनी आपल्या पंखांखाली घेतले आहे. या लेखाबरोबर प्रसिद्ध केलेली जी सूची आहे, ती बघितली की सरांच्या समीक्षेची व्यापकता समजून येते. संपादनकार्यही त्यांचे असेच चौफेर आहे. प्राचीन कविता, वाङ्मयेतिहासाचे खंड, निवडक

क्षीरसागर, एकांकिका, मराठीतील नियतकालिकांचे कार्य, अशी विविधता या संपादनकार्यात आहे. ही संपादने कधी त्यांनी एकट्याने केली आहेत तर काही सहसंपादने आहेत. त्यांच्या व्याख्यानमालाही या विविधतेला अपवाद नाहीत. तिथेही ज्ञानोपासनेचा प्रत्यय येतो. 'मराठी समीक्षा-उद्‌गम आणि विकास', 'कवि काव्यनिर्मिती रसिक', 'केशवसुत, तांबे आणि मर्ढेकर', 'कुसुमाग्रज काव्य आणि तत्त्वज्ञान', 'अस्तित्ववादी साहित्य : मराठीतील उद्रेक', 'दिव्य अमृतधारा : ज्ञानेश्वरी, प्रगत दर्शन', 'ज्ञानेश्वर काव्य आणि काव्यविचार', 'निवृत्तीनाथ : ज्ञानेश्वर'. यांप्रकारे अनेक विषयांचा परामर्श त्यांनी आपल्या व्याख्यानांतून सातत्याने घेतला आहे. या कार्याला समांतर असे अन्य वाङ्मयीन कार्यही त्यांनी मनापासून केले आहे. विविध अभ्यास-आयोग, परिषदा, यांसारख्या समित्यांवर काम केले आहे. मराठी भाषेचे संवर्धन व संशोधन विविध अंगांनी कसे होईल यासाठी पीएच्. डी.च्या विद्यार्थ्यांना संशोधनासाठी मार्गदर्शन केले आहे. त्यांचे वाङ्मयकार्य असे अनेक पैलूंनी, दिशांनी झालेले आहे. व्यक्तिगत पातळीवर केलेल्या कार्याचे स्वरूप कसे असावे किंवा असू शकते याचा आदर्श निर्माण करणारे आहे असे म्हणणे अतिशयोक्तीचे वाटणार नाही.

या सर्वच कार्याचा विचार या ठिकाणी करणे शक्य नाही. त्यांच्या लेखनाचे विषयवार वर्गीकरण करणे शक्य आहे. तसे वर्गीकरण करून काही प्रमुख विषयांचा विचार करणे शक्य होईल असे दिसते. प्राचीन काव्य, महानुभावीय साहित्य, संत साहित्य हे त्यांच्या खास आवडीचे विषय आहेत. 'नाटक' या प्रयोगक्षम कलेचे त्यांना आकर्षण आहे. नाटक हे वाचण्यासाठी नसतेच. नाटक ही दृश्कला आहे. त्यामुळे नाटक बघितल्याशिवाय नाटकावर

**कविता ज्ञानेश्वरांची !**

*''ही सर्व कविता प्रचीतीची कविता आहे. आणि त्या अनुभवांच्या कवितेला रसिक हा कुठंतरी त्या अनुभवाला स्पर्श करणारा पाहिजे. हा स्पर्श जर घडत नसेल तर आपण त्याचे अधिकारी रसिक किंवा आस्वादक होऊ शकत नाही. पहिल्या खंडामध्ये साधारणीकरण क्रिया हा शब्द वापरला होता - की या अनन्यसाधारणाला काही तरी साधारण आपल्या जीवनात असतं - लहान मुलगी मोठी होते, वयात येते, तिला प्रेम समजतं, ती लग्नाच्या वेळी लाजरी-बुजरी होते, आपण सगळे आनंदाने तो सोहळा पाहतो. हे अनुभूतींचं आपल्या जवळ जे संचित असतं, त्याच्या जीवावरती 'फुलराणी'चा अनुभव आपण घेतो. इथं संत साहित्यात अनुभवाचं संचित काय आहे? तर आपल्या मनाची विशुद्धता, मनाची उदारता, अधिकाधिक आपण मनाशी तन्मय किती होऊ शकतो, आपल्या हृदयाचा विस्तार किती होऊ शकतो, करुणेचा विस्तार किती होऊ शकतो, यावर सारं अवलंबून असतं. हे जर आपल्याजवळ असेल तर संत साहित्याच्या आपण खूप जवळ जाऊ शकतो.''*

*(संत साहित्याची संकल्पना : डॉ. व. दि. कुलकर्णी पृष्ठ : ५५)*



अनुक्रमणिका






बोलू नये किंवा लिहू नये' हा त्यांचा कटाक्ष आहे.

'अर्वाचिन मराठी सारस्वतकार' आणि 'साहित्य रूप आणि गंध' ही सरांची दोन महत्त्वाची पुस्तके आहेत.

इ. स. १८१८ ते इ. स. १९५० हा कालखंड भारतीय इतिहासात महत्त्वाचा आहे. सामाजिक प्रबोधन व स्वातंत्रसमराचा हा कालखंड आहे. या काळात नवीन जीवननिष्ठा व साहित्यनिष्ठा जन्म घेऊन रुजत होत्या. या निष्ठांना रुजवण्याचे कार्य अनेक व्यक्तींनी विविध माध्यमांमधून केले. वृत्तपत्रकार, निबंधकार, कादंबरीकार, कवी, विचारवंत यांनी या काळाला घडविण्यात मोठा हातभार लावला आहे. या काळातील विविध क्षेत्रातील मान्यवर व्यक्ती व त्यांचे कार्य यांचा विचार सरांनी 'अर्वाचीन मराठी सारस्वतकार' या ग्रंथात केला आहे. 'बाळशास्त्री जांभेकर : दर्पणकार', 'परशुराम पंत तात्या गोडबोले : नवनीतकार', 'हरिभाऊ व केशवसुत : दोन युगप्रवर्तक', 'रे. टिळक : खरा प्रेममार्गी खरा सेवाधर्मी', 'डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे : ऐश्वर्याच्या राजविद्येचे प्राध्यापक' अशी विविध व्यक्तींची त्यांनी निवड केली आहे. एकूण दहा व्यक्तींवर त्यांनी लिहिले आहे. 'उपोद्घात'मध्ये या काळाचे सर्वांगीण रूप त्यांनी स्पष्ट केले आहे.

कोणत्याही कलाकृतीचे कलाकृती म्हणून असणारे स्वतंत्र रूप डॉ. व. दि. कुलकर्णी यांना महत्त्वाचे वाटते. परंतु आकलन व आस्वाद यासाठी त्या कलाकृतीची रूपनिश्चिती केली पाहिजे. याची अनिवार्यताही त्यांना जाणवते. तितकीच महत्त्वाची वाटते. अशा स्वतंत्र रूप घेऊन आलेल्या कलाकृती व त्यांचे प्रतिभासंपन्न निर्माते यांचा वेध घेऊन त्या कलाकृतीचे वाङ्मयरूप व आकलन यांना भिडण्यासाठी एक दिशाच सर आपल्या समीक्षेतून स्पष्ट करतात.

'साहित्य रूप आणि गंध' या लेखसंग्रहात विविध साहित्यकृतींचा वेध घेणारे त्यांचे १४ आस्वादक लेख आहेत. 'महाभारत : एक सुबद्ध आर्त महाकाव्य', 'दिव्य अमृतधारा : ज्ञानेश्वरीचे प्रगतदर्शन', 'बालकवी : एकांतगीत गाणारा खिन्न पारवा', 'जयमंगला : एक भावगीतातले कथाकाव्य', 'चक्र-प्रतिमा योजनाचा एक आदर्श', 'चक्र आणि माता द्रौपदी' अशा विविध कलाकृतींवर त्यांनी आस्वादक समीक्षा लिहिली आहे.

ही दोन्ही पुस्तके सरांच्या समीक्षावृत्तीची एक स्वतंत्र दृष्टी स्पष्ट करतात. कोणतीही कलाकृती व कलावंत यांचा व्यक्तिगत पातळीवर तसेच व्यापक सामाजिक पातळीवर विचार करता येत असतो. काळ कोणता आहे, या दृष्टीने त्या कलाकृतीचे व कलावंताचे वेगळे महत्त्व असते. वाङ्मयीन विचारांबरोबर या दोन स्वतंत्र दृष्टिकोनातून वाङ्मयीन कलेचा विचार केला पाहिजे. या सरांच्या व्यापक वाङ्मयीन भूमिकेची साक्ष ही पुस्तके आहेत.

त्यांची संपादित व सहसंपादित पुस्तके हा एक स्वतंत्र विभागच आहे. संपादक म्हणून त्यांचा वेगळा विचार करावा लागतो. याबरोबर ललित लेखनही त्यांनी केले आहे. दिवाळी अंकांतून हे लेखन बहुतांशी प्रसिद्ध झाले आहे. 'धुळाक्षरातून मूळाक्षराकडे' म्हणजेच माझे विद्याजीवन' हे त्यांचे आत्मचरित्रच आहे. 'सुमित्रा संवाद' या पुस्तकामध्ये त्यांनी आपल्या वैवाहिक जीवनाचे चित्र तन्मयतेने रंगवले आहे. त्यांच्या पत्नी सौ. सुमित्राबाईंना त्यांच्या



अनुक्रमणिका

जीवनात अनन्यसाधारण महत्त्व होते. आपल्या पत्नीविषयीचा अपार कृतज्ञता भाव ह्या पुस्तकात उत्कटपणे उतरला आहे. त्यांनी पत्नीला वाहिलेली जणू ही श्रद्धांजलीच आहे. अखंड ज्ञानयज्ञ करणारे सर अंतर्यामी हळूवार आहेत. हळवे आहेत. सौम्यता हा त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा गाभा आहे. त्यांचे साहित्यक्षेत्रातील कार्य आणि त्यांचे कौटुंबिक जीवन या दोन पुस्तकांतून उभे राहते.

प्राचीन मराठी वाङ्मयामध्ये महानुभावीय साहित्य आपल्या अंगभूत वैशिष्ट्यांनी अनेक अभ्यासकांना सतत आकर्षित करीत असते. 'महानुभावीय साहित्य' हा सरांच्या आवडीचा विषय आहे. 'लीळाचरित्रा' बरोबर 'गोविंदप्रभू चरित्र', ''चक्रधर स्वामी यांचे मोकळे दृष्टांत', 'अज्ञात लीळा' यांचेही सरांनी संपादन केले आहे. 'लीळाचरित्र' व 'गोविंदप्रभू चरित्र' हे दोन ग्रंथ सरांना चरित्रग्रंथ म्हणून तसेच वाङ्मयीन ग्रंथ म्हणूनही महत्त्वाचे वाटतात.

'अज्ञात लीळा' या ग्रंथाकडे सरांनी स्वतंत्र दृष्टीने बघितले आहे. या लीळांमध्ये सरांना आद्य मराठी कथेची विविध रूपे दिसतात. या दृष्टिकोनातून सर 'अज्ञात लीळां'चा चिकित्सक वेध घेतात. या लीळांमध्ये पुराणातील कोणत्या कथा येतात, भक्ती व धर्म यांच्या संदर्भात काही आदर्श त्या कशा उभ्या करतात, या दृष्टीने 'अज्ञात लीळा' सरांना महत्त्वाच्या वाटतात. मराठी कथेची आद्य रूपे म्हणून सर 'अज्ञात लीळां'चे महत्त्व सिद्ध करतात. संपादनामध्ये आपले निष्कर्ष त्यांनी याच दृष्टीने व्यक्त केले आहेत.

'अज्ञात लीळां'चे वाङ्मयीन व्यवच्छेद लक्षण निश्चित करावयाचे असेल तर ते या कथारूप

**मना सज्जना !**

*''हे सारे संत-सत्पुरुष हे केवळ ब्रह्माचे, विमल ब्रह्माचे उपासक होते. ते स्वतःच कैवल्याचे तेजोरूप होते. रामदास हे भागवत होते का? ते वैष्णव होते का? ते वारकरी पंथात कसे येऊ शकतील? या प्रश्नांनी आम्हाला कधीही सतावलं नाही. हे प्रश्न आमच्या मनाला स्पर्शूनही गेले नाहीत. 'सर्व पिंड-ब्रह्मांडात प्रभू रामचंद्र कोंदाटून राहिला आहे.' असं अनुभवणारे रामदासस्वामी आणि 'जिकडे पाही तिकडे विठ्ठलच व्यापून उरला आहे.' असं उद्गारणारे तुकाराममहाराज काय वेगवेगळे आहेत? राम आणि कृष्ण हे काय वेगवेगळे आहेत? 'रामदास्य हे 'कृष्णदास्याहून निराळं आहे काय? राम आणि विठ्ठल यांच्यातील अद्वैताची अनुभूती रामदासस्वामींनी 'येथे उभा का श्रीरामा' या आपल्य गीतात अगदी सहजतेने व्यक्त केली आहे. नव्हे ती सहजतेनं व्यक्त झाली आहे. विठ्ठलमूर्तीकडे पाहताना इथं राम तर दिसतो आहे. पण राममूर्तीची चिन्ह तर दिसत नाहीत. उलट चिन्ह दिसत आहेत, ती त्या विठ्ठलमूर्तीची ! काही अपूर्व 'हरवलं, सापडल्याची अद्‌भुत चमत्कृतिपूर्ण अनुभूती रामदासस्वामींनी या गीतात अगदी मोजक्या शब्दात प्रकट केली आहे.''*

*(संत सारस्वत आकलन आणि आस्वाद : डॉ. व. दि. कुलकर्णी : पृष्ठ : १०४)*



अनुक्रमणिका







लीळांना अनुलक्षूनच करावेसे वाटते. 'मराठी गद्य कथेची विशुद्ध आद्यरूपे सादर करणाऱ्या लीळांना समाविष्ट करून घेणारा लीळाचरित्राचा जो भाग तो 'अज्ञात लीळा' होय! असे म्हणता येईल. मराठी गद्यकथा १४ व्या १५ व्या शतकात जन्मली असावी आणि ती 'पंचतंत्राच्या भाषांतर रूपाने जन्मली असावी. हा समजही आता दूर होऊ शकेल. मराठी गद्यकथेचे मूळ 'अज्ञात लीळां'मध्ये आहे.'' (अज्ञात लीळा : प्रस्तावना : पृ. ३०)

प्रपंच व समाज यापासून कटाक्षाने दूर राहण्यावर महानुभावपंथाचा आग्रह होता. 'अस्त आणि विजन' यांचा आग्रह यातूनच निर्माण झाला होता. अशा या पंथाचे साहित्य त्यांनी गुप्तलिपीमध्ये लिहूनही ते एकप्रकारे समाजाच्या जवळ गेलेच होते. यादवकाळीन बोली भाषेत या ग्रंथांचे लेखन झाल्याने समाजवास्तवाचे चित्र महानुभावीय साहित्य स्पष्टपणे दाखवते. या भूमिकेतून या साहित्याचे महत्त्वही सरांनी अधोरेखित केले आहे.

'' 'श्री गोविंदप्रभू चरित्रा'त एकूण समाजमनाचे इतके वैविध्यपूर्ण व तपशिलाने भरलेले चित्रण येऊन जाते की मन विस्मयचकित होते. मराठीत वास्तववाद एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीला आला असे आपण मानतो. पण तो वास्तववाद खरे तर मराठी वाङ्मयाच्या उदयकालीच अगदी 'प्रत्यक्षतेने' आला असे म्हणावे लागेल. 'लीळाचरित्र' आणि आद्य सामजिक वास्तववादी गद्यकथा-वाङ्मयकृती होत ! साधी संसारी माणसे आणि थोर अवतारी महात्मे यांच्यातील नाती किती विविध प्रकारची असतात, हे अशा कथासदृश लीळांतून ध्यानी येते. माळीण, तेलीण, पुजारी, महाजन, व्यापारी, शेठ, सावकार, विद्वान-पंडित, वेदांती-ब्राह्मण इत्यादींनी मिळून येथे एक सर्वसामान्य व्यापक 'समाजमन' निर्माण होते. आणि मग त्या वास्तव मानवी मनोभूमीवर श्री गोविंदप्रभूंचे अवतारित्व अलौकिक रूपाने उठून दिसते.' (गोविंदप्रभू चरित्र : प्रस्तावना : पृ. ३९, ४०)

महानुभावीय साहित्यामधील वाङ्मयीन रूपांचा शोध आणि त्यांचा चिकित्सक अभ्यास या दृष्टीने सरांच्या या ग्रंथांचे महत्त्व आहे. महानुभावीय साहित्याकडे बघण्याची एक स्वतंत्र दिशा सरांनी सिद्ध केली आहे, असे दिसून येते. त्यांचे हे संशोधन महानुभावीय महंतांनी मान्य केले. इतकेच नव्हे तर त्यांना पुरस्कारही दिला आहे.

प्राचीन मराठी साहित्याचा विचार काहीसा साचेबंद कल्पनांमधून होत होता. साहित्य विचारांपेक्षा चरित्रात्मक अंगांनीच त्या साहित्याचा विचार होत होता. या साहित्याकडे स्वतंत्र वाङ्मयीन दृष्टीने बघणे आवश्यक आहे. ही गरज सरांना वाटत होती. हे मध्ययुगीन साहित्य अनेक वाङ्मयीन रूपांना घेऊन आले आहे. त्यामध्ये एक प्रवास आहे. काही वळणांनी जाणारी एक वाटचाल आहे. वाङ्मयीन दृष्टीने वाङ्मयेतिहासाच्या दृष्टीने आणि सांस्कृतिक दृष्टीनेही ही वाटचाल सिद्ध होणे आवश्यक आहे. या स्वतंत्रदृष्टीने सरांनी प्राचीन मराठी कालखंडातील कवितांचे संपादन केले आहे.

मराठीतील 'संत सारस्वत' हा सरांच्या आंवडीचा खास विषय आहे. या साहित्याविषयी त्यांना आदर, प्रेम आहे. मनात श्रद्धा आहे. आध्यात्मिक आणि भक्तिप्रवण असे वातावरण सरांच्या घरातच होते. धर्मपरायण वृत्तीचे वडील व थोरले बंधू उद्धवराव होते. घरात ज्ञानेश्वरी,

भागवत, दासबोध यांची नित्य पारायणे होत असत. तुकारामांचे अभंग कानावर पडत असत. त्या वातावरणातून त्यांचा सश्रद्ध असा पिंड जसा पोसला गेला तसेच या संत सारस्वताचे आकर्षणही निर्माण झाले. पुढे अध्ययन अध्यापनाचा विषय म्हणूनही हे साहित्य त्यांच्या वाचनात, चिंतनात नित्य होते. परंतु बाबामहाराज आर्विकर यांचा अलौकिक ग्रंथ 'दिव्य अमृतधारा' हा त्यांच्या वाचनात आला आणि जणू त्यांना ज्ञानेश्वरीकडे बघण्याची नवीन दृष्टीच मिळाली. ज्ञानेश्वरी - संतसाहित्य यांचे नव्याने आकलन झाले. चिंतनाला सखोलता आली. 'परतत्त्वाचा स्पर्श' म्हणजे काय याची अनुभूती आली. सरांच्या संतसाहित्य विषयक चिंतनावर त्यातही ज्ञानेश्वर व ज्ञानेश्वरी विषयक त्यांच्या चिंतनावर विवेचनावर 'दिव्य अमृतधारा' या ग्रंथाचा खोलवर प्रभाव आहे. या काळातच त्यांच्या पत्नी सौ. सुमित्राबाई अधिक आजारी झाल्या होत्या. लेखनाचा पसारा आवरून त्यांनी पत्नीची सेवा केली होती. आपल्या माघारी आपल्या पतीला मानसिक आधार व बळ देणारी एकच गोष्ट आहे - म्हणजे परतत्त्वाचा स्पर्श असणारे 'संत सारस्वत'. या संदर्भात सरांचे अनेक प्रकल्प-संकल्प काहीसे रेंगाळत होते. 'या सर्वांची पूर्तता मी करीन, ते संकल्प मी पूर्ण करेन' अशी अभिवचने सुमित्राबाईंनी त्यांच्याकडून घेतली होती. आणि खरोखरच सुमित्राबाईंच्या मृत्यूनंतर काही काळाने सरांनी स्वत:ला सावरले आणि मनाने, हृदयाने 'संत सारस्वता'त परतत्त्वस्पर्शाच्या ओढीने स्वत:ला त्यांनी उतरवले. अनेक व्याख्यानमालांमधून त्यांनी ज्ञानेश्वर, ज्ञानेश्वरी आणि संत सारस्वत या संदर्भात भरभरून विवेचन केले आहे. 'संत साहित्याची संकल्पना', 'संत सारस्वत : आकलन आणि आस्वाद', 'श्री ज्ञानेश्वर : तत्त्वज्ञ : संत आणि कवी', 'ज्ञानेश्वरांचे काव्यशास्त्र' ही त्यांची पुस्तके सौ. सुमित्राबाईंच्या निधनानंतर प्रकाशित झाली आहेत. संत सारस्वताकडे बघण्याची स्वतंत्र भूमिका, हा या सर्व लेखनाचा पाया आहे. त्यांच्यावर या साहित्याचे संस्कार लहानपणापासून झाले

**_प्रस्तावना_**

*''श्री. के. क्षीरसागर हे भाषा, वाङ्मय, व्यक्तिमत्त्वे या बरोबर एकूण जीवनाचेच थोर टीकाकार आहेत. वाङ्मयीन टीका म्हणजे सृष्टीचे रहस्य आणि विश्वाचा आत्मा यांचा वाङ्मयाद्वारा शोध घेणे, असे ते मानतात. श्री. के. क्षी. हे 'सौंदर्यपूजक अध्यात्मवादी' (रोमँटिक फिलॉसॉफर) आहेत. सौंदर्यपूजन आणि भावपूजन यात ज्या सहजतेने आणि उत्कटतेने ते रमतात त्याच सहजतेने आणि उत्कटतेने ते राष्ट्रपूजन आणि संस्कृतिपूजन यात रमतात. त्यांच्या सौंदर्यवादाला (रोमँटिसिझमला) गूढदर्शनाची जोड आहे. त्यांच्या सांस्कृतिपूजनाला तत्त्वदर्शनाची आणि अंतीम शाश्वत मूल्यांची आंतरिक प्रभा लाभलेली आहे. यामुळे श्री. के. क्षी. च्या जीवनमूल्यांना आणि वाङ्मयमूल्यांना एका स्वतंत्र प्रगल्भ आणि परिपक्व अशा तत्त्वज्ञानाची पदवी लाभली आहे.''*

*(निवडक श्री. के. क्षीरसागर : संपा. व. दि. कुलकर्णी प्रस्तावना : पृष्ठ १)*



अनुक्रमणिका

आहेत. या संस्कारांचे चित्र 'संत सारस्वत : आकलन आणि आस्वाद' या ग्रंथातील प्रत्येक लेखात बघायला मिळते. या ठिकाणी संत सारस्वतातील आशयाचा, तत्त्वज्ञानाचा, संतांच्या व्यक्तिमत्त्वाचा आणि अध्यात्म्याच्या विवेचनाचा ते अधिक विचार करताना दिसतात.

संत साहित्याची प्रकृती, त्यातील अनुभवाचे स्वरूप हे लौकिक जीवनाहून किती तरी वेगळे आहे. या साहित्याचे प्रयोजन वेगळे, प्रेरणा वेगळ्या, आशय वेगळा आणि त्यामुळेच अविष्कारही वेगळा आहे. त्याचा गाभा केवळ लौकिक पातळीवर समजावून घेता येत नाही. याचे कारण या साहित्याची निर्मिती आत्मानुभूतीतून झालेली आहे आणि ही अनुभूती अलौकिक जीवनातून आलेली आहे. त्यांचा जीवनस्तर सर्वसामान्यांच्या स्तराहून कितीतरी योजने वरचा-असामान्य आहे. तो केवळ कल्पनेच्या स्तरावर जाणणे शक्य नाही. त्यासाठी संत साहित्याची संकल्पना प्रथम जाणून घेतली पाहिजे. या साहित्याच्या आकलनासाठी या संकल्पनेचे महत्त्व आहे. या संकल्पनेतून नंतर साहित्याकडे जाता येणार आहे. ही सरांची संत सारस्वताकडे बघण्याची स्वतंत्र भूमिका आहे. ही स्वतंत्र संकल्पना वेगळी कशी आहे, अपरिचित कशी आहे, हे परिचियाच्या प्रकाशतच अधिक स्पष्ट होणार आहे. अर्वाचीन कवींमध्ये बालकवी हे प्रकृतीने भिन्न व अपवाद स्वरूपच आहेत. बालकवींची 'फुलराणी' कविता मराठी कवितेतही अपवादात्मक आहे. 'फुलराणी' कविता आणि बालकवींची या कवितेतील उत्फुर्त प्रतिभाशक्ती जाणून घ्यायची असेल तर बालकवींच्या प्रतिभेचा पोत ओळखावा लागतो. त्यांना असणारे निसर्गसौंदर्याचे जे वेड आहे, लुब्ध होणे आहे ते जाणून घ्यावे लागते. तेव्हा 'फुलराणी'चे सौंदर्य आणि काव्य अधिकाधिक उलगडत जाते. त्यासाठी बालकवींच्या फुलराणीच्या निमित्ताने कविता : अर्वाचीनांची प्रथम समजावून देतात आणि त्या प्रकाशात कविता तुकारामांची व कविता : ज्ञानेश्वरांची समजावून देतात. या दोन संतश्रेष्ठांच्या अनुभवाचे स्वरूप त्यांच्या रचनांच्या आधारे उलगडून दाखवतात. हे पुस्तक सरांच्या या विषयातील सर्व लेखनाचा पाया आहे. या पायावर पुढील सर्व पुस्तके उभी आहेत, असे दिसते. प्रथम 'संत साहित्य संकल्पना' नंतर 'संत सारस्वत : आकलन आणि आस्वाद' त्यानंतर 'संत ज्ञानेश्वर : तत्त्वज्ञ संत कवी' आणि शेवटी 'ज्ञानेश्वरांचे काव्यशास्त्र असा एक उत्क्रांतीचा क्रम आहे. या विवेचनाचे केंद्र प्रामुख्याने संत ज्ञानेश्वर व ज्ञानेश्वरी असले तरी विवेचन केवळ ज्ञानेश्वरांपुरते होत नाही. समग्र संत साहित्याची अलौकिकता, प्रत्येकाच्या व्यक्तिमत्त्वाचे स्वतंत्रपण, भिन्न प्रेरणा, भिन्न आविष्कार शैली याचे वेगळेपण ते उलगडून दाखवतात. या विविधतेमध्ये अंतर्यामी एकसूत्रता कशी आहे, ज्ञानेश्वर ते रामदास हे सर्व संत कवी एक आंतरिक समान धाग्याने, समान धर्माने बांधले कसे आहेत, याचे चित्र स्पष्ट होते. ज्ञानेश्वर ते रामदास असा संत परंपरेचा उभा छेद घेऊन हे विवेचन परिपूर्ण होताना दिसते.

संत, तत्त्वज्ञ आणि कवी या ज्ञानेश्वरांच्या व्यक्तिमत्त्वाच्या तीन बाजू आहेत. 'चांगदेव पासष्टी आणि अमृतानुभव' या मधुकर आष्टीकर यांनी संपादित केलेल्या पुस्तकाच्या प्रस्तावनेत 'ज्ञानेश्वर आणि विज्ञान' या विषयी अतिशय मौलिक विवेचन सरांनी केले आहे. याचे विवेचन करताना चांगदेव पासष्टी, अमृतानुभव व ज्ञानेश्वरी या ग्रंथांचे विषय स्पष्ट होतात. या ओघात

गुरू कल्पना, गुरू हे 'सत्'चे रूप कसे आहे, ज्ञानेश्वर म्हणूनच गुरुमहिमा वारंवार कथन का करतात, संत तुकारामांना त्यांचे गुरू बावा चैतन्य यांनी स्वप्नात दृष्टांत दिला होता. 'रामकृष्ण हरी'चे नाम दिले होते. परंतु प्रत्यक्ष जीवनात त्यांना गुरू भेटले नव्हते. तेव्हा तुकारामांनी विठ्ठलालाच आपले गुरू कसे केले होते, याचे विवेचन ते करतात. भारतीयांची ईश्वर कल्पना, आदिब्रह्म माया यांची एकाच ठिंकाणी असणारी भिन्न रूपे कशी आहेत, संतांना त्याचा प्रत्यय कसा येतो, या विषयी ते विवेचन करताना दिसतात. पाश्चात्य विज्ञान आणि भारतीय अध्यात्म यांच्यामध्ये आता पूर्वीप्रमाणे भिंत राहिलेली नाही. या दोन्ही दृष्टींमध्ये सहयोग होऊन ते आता एका दिशेने प्रवास करीत आहेत. या शतकामध्ये आईनस्टाईनचा सापेक्षतावादाचा सिद्धांत मांडला गेला. त्यातून संशोधनाला नवीन कलाटणी मिळाली. त्याचाच पुढचा भाग म्हणजे 'अणू' विषयीचे संशोधन झाले. अणूचे विभाजन करता येते. या संशोधनाअंती येणाऱ्या सत्याची जाणीव विज्ञान युगात नवे भान देणारी आहे. अणूचे विभाजन करता येते. त्यामध्ये ब्रह्मांड सामावले आहे. याचा साक्षात्कार पाश्चात्य विचारवंतांना झाला. याचबरोबर आणखीनही एक सत्य त्यांना स्वीकारावे लागले की प्रयोगशाळेत सिद्ध होऊ शकते तेवढेच सत्य नसते. काही अनुभव काही अनुभूती अशा असतात की त्या प्रयोगांनी सिद्ध करता येत नाहीत. व्यक्तीचा अनुभव हाच प्रयोग असतो. त्याची अनुभूती हीच सत्याचे प्रमाण असते. हा अर्थ

***कवीस सोडा कवितेबरोबरी !***

*''केशवसुतांच्या कवितेमागे स्वतः केशवसुतच उभे राहिलेले दिसतात. त्यांची कविता ही त्यांच्या हृदयाचे ध्वनी आहेत, बोल आहेत. हे त्यांचे बोल कधी जड-बोजड असले तरी ते त्यांचे स्वतःचे आहेत. मग ती कविता जुन्या वळणाची असो, अथवा नव्या वळणाची असो. केशवसुत गायले ते स्वतःचेच - प्रायः स्वतःसाठीच. हे स्वतःसाठीच गाईलेले इतके तन्मयतेचे, तळमळीचे खरेखुरे होते की ते त्यामुळेच सर्वांचे झाले. केशवसुतांची कविता ही प्रथम त्यांची स्वतःची असते व मग ती इतरांची असते. या उलट क्रम तिला मान्य नाही आणि 'केवळ इतरांसाठी' या धर्माचा तर ती धिक्कारच करते.*

*आमुचा पेला दुःखाचा । डोळा मिटुनि प्यायचा ।*
*पिता बुडाशी गाळ दिसे । त्या अनुभव हे नाव असे ।*
*फेकुनी द्या तो जगावरी । अमृत होऊ तो कुणापरी ।*

*हे त्यांचे एक चिंतन त्यांच्या काव्यविचारांच्या संदर्भात सदैव विचार करण्यासारखे आहे. केशवसुतांची कविता ही स्वानुभवातून स्फुरलेली आणि वाढलेली असल्याने आणि हा अनुभव एका 'सत्य-सौंदर्य आणि शिव' या तत्त्वाच्या उपासकांचा असल्याने केशवसुतांच्या कवितेला अमृतत्व लाभले आहे.''*

*(केशवसुतांचे अंतरंग : डॉ. व. दि. कुलकर्णी : पृष्ठ : ६८, ६९)*



अनुक्रमणिका







हे तत्त्वज्ञान आमच्या संतांनी प्रत्यक्ष अनुभूतीनेच जाणले होते. पिंडी ते ब्रह्मांडीचा सिद्धांत त्यांनी अनुभवाआधारेच मांडला होता. 'अणुरेणुया थोकडा । तुका आकाशाएवढा' या तुकारामांच्या वचनात हेच ब्रह्मांडाचे तत्त्व आहे. ज्ञानेश्वरांनी 'अमृतानुभव', 'चांगदेव पासष्टी' या आपल्या ग्रंथांतील तत्त्वज्ञानातून हेच विश्वाचे रहस्य, विज्ञान मांडले आहे. या दृष्टिकोनातून सरांनी संतवाङ्मयातून विज्ञानानुभव कसा येतो, याचे विवेचन केले आहे. या सगळ्या विवेचनातून संत सारस्वताची परंपरा, भागवतधर्माचे रूप, समाजाच्या सर्व थरांना सामावणारी त्यांची भक्तीपरंपरा याचे व्यापक भान येते. या विवेचनात अभ्यासकाची एरवीची वस्तुनिष्ठता जाणवत नाही. संशोधकाचे अलिप्तपण, विवेचनातील टोकदारपणा कुठे जाणवत नाही. व्यक्तिगत भक्तीभावना व सश्रद्ध वृत्ती यांचा स्पर्श या विवेचनाला झाल्याने सर्व विवेचन रसाळ व आल्हादक वृत्तीतून झाल्याचे जाणवते. या सगळ्याबरोबर एक गोष्टही नमूद करावीशी वाटते ती म्हणजे हे सर्व ग्रंथ विविध व्याख्यानमालेतील भाषणांमधून तयार झाले आहेत. त्यामुळे काही वेळा विवेचनात उदाहरणे, कल्पना यांची पुनरुक्ती आढळते ती मान्य करता येते. परंतु काही ठिकाणी विवेचनात काही पदर सुटे राहिल्याचे जाणवते. क्वचित विषय आटोपता घेण्याचा कल जाणवतो. व्याख्यानापेक्षा पुस्तकातील विवेचनात काही प्रमाणात अधिक स्पष्टीकरणाची अपेक्षा ठेवली जाते. या भाषणांचे पुनर्लेखन सरांना वयपरत्वे करणे शक्य झाले नसेल असे वाटते. त्यानेच काही ठिकाणी हा सल बोचतो, हे नम्रपणे सांगावसे वाटते.

'नाटक' हा डॉ. व. दि. कुलकर्णींचा आवडता विषय आहे. नाटकाविषयी त्यांचे लेखनही विपुल आहे. परंतु 'सौभद्र : घटना व स्वरूप' हा ग्रंथ नाट्यसमीक्षेच्या दृष्टीने एकमेव ठरतो. त्यांची नाट्यविषयक ग्रंथरूपी समीक्षा अधिक मिळत नाही. परिणामी त्यांना 'नाट्यसमीक्षक' अशी ओळख तितकीशी मिळत नाही. त्यांची एकूणच समीक्षकाची प्रतिमा सर्वस्पर्शी असल्याने 'नाट्यसमीक्षक' या स्वतंत्र ओळखीची त्यांना गरजच नाही, हेही तितकेच खरे आहे.

डॉ. व. दि. कुलकर्णी यांच्या समग्र समीक्षालेखनाचा एकत्रित विचार करणे आवश्यक आहे. समीक्षक म्हणून त्यांनी मराठी समीक्षेत विपुल लेखन केले हे खरे. परंतु एवढ्यावर त्यांचे महत्त्व ठरत नाही. आपल्या समग्र लेखनातून समीक्षेच्या स्वतंत्र पद्धतीतून आणि शिस्तीतून त्यांनी उपयोजित समीक्षेची एक पद्धतच सिद्ध केली आहे.

साहित्य संशोधनाची शास्त्रीय व्यवस्थापना-वर्गीकरणावर आधारित संशोधनपद्धती (Reserch Methodology) त्यांनी घालून दिली आहे. साधारणपणे गेल्या पन्नास वर्षांमध्ये मराठी भाषा, मराठी साहित्य यांच्या संदर्भात अध्ययन-अध्यापन यांच्या पातळ्यांवर पदवी तसेच पद्व्युत्तर स्तरावर जे बदल झाले, जे कार्य झाले, वाङ्मयविषयक नवीन जाणीवा आल्या. विविध दिशांनी संशोधनाच्या अनेक शक्यता दिसल्या. तसेच विविध अंगांनी जे संशोधनही झाले, त्याचे स्वरूप समजते. साहित्याच्या तात्त्विक विचारांच्या संदर्भात नवीन संकल्पना रुजल्या तसेच समीक्षेच्या अनेक नव्या उपपत्ती मांडल्या गेल्या. या सगळ्या मंथनातून साहित्य विषयक अभिरुची, जाण, प्रगल्भ होत गेली. कलात्मक जाणीव सूक्ष्म होत गेली. दुसऱ्या महायुद्धाच्या काळाच्या आसपास सर्वसाधारणपणे जीवनाच्या सर्वच क्षेत्रात नवीन जाग



अनुक्रमणिका

येत होती. त्याप्रमाणे निर्हेतूक कलानिर्मितीची अपरिहार्यताही रुजत होती. त्या सर्वांचा परिणाम साहित्याकडे बघण्याचा दृष्टिकोन, निर्मिती, समीक्षा व संशोधन यावर निश्चित झाला होता. वाङ्मयेतिहासाची संकल्पना नव्याने आली. तसेच साहित्य, संस्कृती, साहित्य व अन्य समाजशास्त्रे यांचे अनुसंध नव्याने जाणवले. या सर्व बाजूंनी जे अभिसरण या पन्नास वर्षांमध्ये साहित्यविश्वात झाले, त्याचे प्रातिनिधिक चित्र सरांच्या समीक्षेत त्यांच्या वाङ्मयीन कार्यात स्पष्टपणे दिसते.

ग्रंथसंपादनाची भूमिका कशी असावी, संपादकाची विशिष्ट भूमिका आणि सूत्र त्या ग्रंथाला एकत्र बांधत असते. त्यामुळे तो केवळ एक संग्रह होत नाही तर विषय-विषयावरील एका ग्रंथाचे मोल या संपादित पुस्तकाला प्राप्त होते. त्यांची संपादने व त्यांची संपादकीये एक वस्तुपाठच घालून देतात. एक गोष्ट निश्चितपणे जाणवते. ती म्हणजे त्यांचा 'साहित्य विचार' या सर्व लेखनातून जाणवतो. परंतु निखळपणे समोर येत नाही. साहित्याचा तात्त्विक विचार, कलात्मक दृष्टी आणि वाङ्मयीन समीक्षा याविषयीचे त्यांचे विचार त्यांच्या लेखनातून प्रत्येक ठिकाणी व्यक्त झाले आहेत. त्यामुळे त्यांचे तात्त्विक विचार सर्वत्र विखुरलेले आहेत. ते एकत्रितपणे ग्रंथरूपाने सिद्ध होणे आवश्यक होते.

डॉ. व. दि. कुलकर्णी यांच्या समग्र समीक्षा कार्याचा, ग्रंथसंपदेचा विचार करताना ही उणीव जाणवत राहते. 'धुळाक्षरातून मूळाक्षराकडे' या त्यांच्या आत्मकथनातील दुसऱ्या व तिसऱ्या भागात त्यांचे काही विचार व्यक्त होतात. संपादकीये, अन्य स्वतंत्र ग्रंथांमधूनही वेळोवेळी सर आपले तात्त्विक विचार व्यक्तही करतात. परंतु त्या विचारांचे स्वरूप अनुषंगिक आहे. डॉ. व. दि. कुलकर्णी यांच्या साहित्य विचारांच्या संदर्भातील समीक्षाग्रंथ त्यांच्या सर्व वाङ्मयीन कार्यावर कळसाप्रमाणे शोभला असता.

### *ज्ञानेश्वरांचे काव्यशास्त्र !*

*''संत साहित्य हे स्वानुभावप्रमाण साहित्य आहे. संत आत्मानुभावच आपल्या काव्यातून प्रकट करतात. आत्मानुभाव म्हणजे 'स्वत:चा अनुभव' हे खरे; पण संतांचा स्वत:चा अनुभव हा आत्म्याचा अनुभव असतो. परब्रह्माचा अनुभव असतो. परब्रह्मानुभव हा संत साहित्याचा स्वयंसिद्ध विषय आहे. हा अनुभव जसाच्या तसा, शब्दरूपातून अभिव्यक्त करणे हा संत साहित्याचा स्वभावधर्म आहे. येथे काल्पनिक किंवा कल्पित काही नाही. मूळ वास्तव हे कलात्मक कल्पनेच्या स्तरावर नेणे असला काही प्रकार येथे नाही. त्यामुळे काव्यशास्त्रीय रुढार्थाने 'नवनिर्मिती' नावाचे काही नाही. मुळातच जे आहे ते प्रतिक्षणी नवता धारण करणारे, असे सदैव आनंदरूप, स्पंदमात्र, चित्-स्वरूप, ज्ञानस्वरूप आहे. 'यदक्षरं अनाख्येयं आनंदं अजं केवलम्' असे ते आहे.''*

*(ज्ञानेश्वरांचे काव्यशास्त्र : डॉ. व. दि. कुलकर्णी : पृष्ठ : ६)*










सदर ग्रंथलेखनाचा विचार सरांनीच खुद्द केला तर उत्तमच आहे. परंतु प्रकृतीमुळे त्यांना शक्य नसेल तर त्यांचे मित्र, स्नेही, विद्यार्थी यांपैकी कोणी तरी सदर ग्रंथाच्या निर्मितीची जबाबदारी स्वीकारावी. या स्वरूपाच्या ग्रंथाची गरज ही 'वाङ्मयीन गरज' आहे. समीक्षा व संशोधन यांची गरज आहे. पुढील काळातील, पुढील शतकातील मराठी भाषेतील वाङ्मयीन कार्याला अशा एका दीपस्तंभाची आवश्यकता आहे. अधिक सांगणे न लगे.

स्वाती सुहास कर्वे
१४१४ कसबा पेठ, शनिवारवाड्यासमोर, पुणे ४११ ०११.
फोन : ४५६९९५.

## स्वागत

- **उपवन :** सुमेधा देसाई, इंद्रायणी साहित्य, पुणे, पृष्ठे ८०
- **मनाचिये गुंफी :** वसंत आपटे, इंद्रायणी साहित्य, पुणे, पृष्ठे ८०
- **फक्त सहा दिवसात स्मरणशक्ती वाढवा :** शाम मराठे, इंद्रायणी साहित्य, पुणे, पृष्ठे ९६
- **बांडगूळ :** भीमसेन देठे, प्रमिला जाधव, मुंबई, पृष्ठे ६४
- **ज्ञानेश्वर आणि कबीर :** कृ. ज्ञा. भिंगारकर, पुष्पक प्रकाशन, पुणे. पृष्ठे २७१
- **अंतरंग :** अरुण शेवते, ऋतुरंग प्रकाशन, मुंबई. पृष्ठे २२१
- **गेले ते दिन गेले :** अरुण शेवते, ऋतुरंग प्रकाशन, मुंबई. पृष्ठे १४१
- **मैत्र जीवाचे :** अरुण शेवते, ऋतुरंग प्रकाशन, मुंबई. पृष्ठे २०८
- **टीव्ही आणि मुले :** अलका वाडकर, पुणे. पृष्ठे ८८
- **कुसुमाग्रजांच्या प्रतिभेचा उगम व विकास :** द.दि.पुंडे, प्रतिमा प्रकाशन, पुणे. पृष्ठे २०६
- **तृप्ता :** रेखा बैजल, देशमुख आणि कं., पुणे. पृष्ठे १८९
- **तंतू :** एस.एल.भैरप्पा, मेहता पब्लिशिंग हाऊस, पृष्ठे ८७८
- **छोटे मासे मोठे मासे :** पु. ल. देशपांडे, अनु. उमा कुलकर्णी, श्रीविद्या प्रकाशन, पुणे. पृष्ठे ११५
- **नारीभक्षक :** विलास मनोहर, श्रीविद्या प्रकाशन, पुणे. पृष्ठे २६०
- **भाषा विवेक :** मंगेश विठ्ठल राजाध्यक्ष, श्रीविद्या प्रकाशन, पुणे. पृष्ठे २०८
- **वळणावरचे साकव :** चंद्रकांत वर्तक, राजहंस प्रकाशन, पुणे. पृष्ठे १७१
- **साहित्याचे नवीन भाषा तत्त्वज्ञान :** वि. ना. ढवळे, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे. पृष्ठे १७३
- **उदक :** लक्ष्मीकांत देशमुख, साकेत प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे २११










# शोध महात्मा गांधींचा / अरुण सारथी

महात्मा गांधींच्या
व्यावहारिक
आणि राजकीय
यशापयशाची
मीमांसा करणारा,
फाळणीची
विनाशकारी
शोकांतिका कशी
उद्भवली याचे
साधार विवेचन
असलेला ग्रंथ.




अहिंसावादी
असूनही
आयुष्याच्या
अखेरीस
महात्मा गांधींना
जातीय विद्वेष
आणि हिंसा
यांचेच
थैमान
का पहावे
लागले?

| | | |
|---|---|---|
| खंड १ :- पृष्ठसंख्या ५२८<br>खंड २ :- पृष्ठसंख्या ५७२<br>मूल्य : प्रत्येकी ३५०/-<br>सवलतीत प्रत्येकी ३००/- | **अस्मिता प्रकाशन**<br>४५८/२, सदाशिव पेठ,<br>पुणे-४११ ०३०.<br>दूरध्वनी : ५३३५९७ | सुबक छपाई<br>मजबूत बांधणी,<br>प्लॅस्टिक जॅकेटसह,<br>मुखपृष्ठ : चंद्रमोहन कुलकर्णी |

दस्तऐवज आणि त्यांचा अन्वयार्थ म्हणजे इतिहास. या सूत्रानुसार गांधींच्या व्यक्तिमत्त्वाचा आणि त्यांच्या भारतीय राजकारणातील योगदानाचा इतिहास या ग्रंथात घेतला गेला आहे. गांधींच्या संकलित वाङ्मयाचे तर्कशुद्ध विश्लेषण करून त्यातून गांधींची जी वास्तव प्रतिमा उभी राहते तिचे दर्शन घडविण्याचा प्रयत्न लेखकाने केला आहे. परदेशी विचारवंत आणि त्यांच्या प्रभावाखाली देशी लेखकांनी गांधींचे जे व्यक्तिमत्त्व रेखाटले आहे त्यापेक्षा संकलित वाङ्मयातून उभे राहणारे गांधी अगदी वेगळेपणाने प्रतीत होतात. संकलित वाङ्मयात ते माणूस वाटतात, अतिमानव नव्हे. प्रस्तुत लेखकाने गांधींसंबंधी साधबाधक अशी कोणतीही भूमिका न घेता संकलित वाङ्मयाचे सलग वाचन करताना जी प्रतिमा आपातत: उभी राहाते तिचेच फक्त दर्शन घडविले आहे. ते करीत असताना खुद्द लेखकाच्या मनात लहानपणापासून बाळगलेली गांधींची जी प्रतिमा होती तिला धक्का पोहोचवणाऱ्या अनेक घटना दृष्टोपत्तीला आल्या. साहजिकच भारतीय राजकारणाला असलेल्या गांधींच्या योगदानाबद्दल नव्याने पुनर्विचार करण्याची गरज त्याला वाटू लागली. त्यातून निर्माण झालेला ग्रंथ !

# 'गंगाधर गाडगीळ : व्यक्ती आणि सृष्टी'च्या निमित्ताने

अरविंद वामन कुळकर्णी

गंगाधर गाडगीळ हे मोठा दबदबा असलेले मराठी साहित्यसृष्टीतील एक आघाडीचे नाव. त्यातही गेली पन्नासेक वर्षे आघाडी सांभाळणारेही नाव. त्यांचा जन्म १९२३ सालच्या २५ ऑगस्टला मुंबईला झाला. याचा उल्लेख एवढ्यासाठीच की, या १९९८ सालच्या २५ ऑगस्टला त्यांची पंच्याहत्तरी साजरी व्हायची आहे. आजही दिसून येणारा त्यांच्या संवेदनक्षमतेतील ताजेपणा आणि विचारशक्तीतील आक्रमकता त्यांनी वयाला चकविले असल्याचेच दाखवून देते. कालबाह्य होणे काहींच्या प्रकृतीतच नसते. स्वत्व टिकवून कालबाह्यतेचा गंज टाळलेल्या अगदीच मोजक्या भाग्यवंतांपैकी गाडगीळ एक आहेत आणि विशेष हे की मराठी समुदायात असूनही त्यांना केल्या कामाची सतत पावतीही मिळत गेलेली आहे. उपेक्षेचा सल त्यांना कधी सहन करावा लागलेला नाही. सतत पन्नासेक वर्षे त्यांचे नाव या ना त्या कारणाने मराठी साहित्यसृष्टीत गाजत राहिलेले आहे. याबाबतीत बा. सी. मर्ढेकर आणि विजय तेंडुलकर अशी दोनच नावे त्यांच्या शेजारी बसू शकतात ! एका बाजूला जुने न होणे आणि दुसऱ्या बाजूला सतत नव्याला आवाहन करीत राहणे हा गाडगीळांचा खास विशेष झालेला आहे. तेव्हा त्यांनी केलेल्या कामाचे, अगदी त्यांच्या भांडखोरपणाचेही योग्य ते कौतुक व आदर करून मराठी साहित्यप्रेमी त्यांना एका 'समाधानी-कृतार्थ-पंच्याहत्तरी'चा अनुभव भेट म्हणून देत आहेत. या प्रेमींची इच्छा व अपेक्षा इतकीच आहे, की गाडगीळांना आरोग्यसंपन्न दीर्घायुष्य लाभावे आणि त्यांनी खास 'गाडगिळी बनावटी'च्या अलंकारांनी मराठी साहित्याचा सराफकट्टा सजवीत राहावे!




सर्वसाधारणपणे एखाद्या लेखकाचे मूल्यमापन करताना संख्यात्मक आणि गुणात्मक अशा दोन फूटपट्ट्यांचा अवलंब करणारी एक सरळसोट, बाळबोध म्हणावी अशी पद्धती रूढ आहे. संख्यात्मक पद्धतीत लेखकाने किती साहित्यप्रकार हाताळले आहेत किंवा एकूण किती पुस्तके लिहिली आहेत, याची मोजदाद बसते. (मराठी माणसाने तरी या पद्धतीला हसू नये. कारण प्रामुख्याने याचाच आधार घेऊन साहित्यसम्राट-पदही बहाल केले गेलेले दिसते !) कविता हा

प्रकार सोडला तर कथा, कादंबरी, ललितगद्य, नाटक, एकांकिका, आत्मचरित्र, प्रवासवर्णन, समीक्षा, (तसेच अर्थशास्त्रीय निबंधलेखन) अशा जवळजवळ सर्व गद्य साहित्यप्रकारात गाडगीळांनी लेखन केलेले आहे. मुख्य म्हणजे त्यांच्या बरोबरीने उल्लेखिल्या जाणाऱ्या इतर लेखकांना न जमलेले विनोद आणि बालविश्व हे दोन 'विषय' त्यांनी हाताळले आहेत. स्वतंत्रपणे या 'विषयां'ची दखल घेणारी त्यांची अनुक्रमे ६+७=१३ इतकी पुस्तके असून नाटक-एकांकिकांची चारेक पुस्तके आहेत. विद्यापीठीय अभ्यासाचा विषय असलेल्या अर्थशास्त्रावरही त्यांनी गंमतीच्या आविर्भावातून चुरचुरीत लेखन केलेले आहे. त्यांच्या लिखित पुस्तकांची एकूण संख्याही पाऊणशेच्या घरात पोहोचलेली दिसते. तेव्हा अगदी 'व्यापारी' हिशेबात बोलायचे तर विविधता आणि विपुलता या दोन्ही दृष्टींनी गंगाधर गाडगीळांचे साहित्य-भांडार चांगलेच सजलेले आहे.

गुणवत्तेच्या दृष्टीने पाहायचे तर या भांडारातील माल चांगल्या दर्जाचा, ग्राहकांच्या किंवा चोखंदळांच्या पसंतीस उतरेल असाच आहे, असे म्हणता येईल. तसे एक प्रशस्तीपत्रक सर्वप्रथम बा. सी. मर्ढेकरांनी 'सत्यकथे'च्या जून १९४७ च्या अंकातून दिलेले दिसते. काहींनी तशा तक्रारीही केल्या, पण काळाच्या ओघात त्या लुप्त झाल्या. शिवाय या साहित्य-भांडारास गिऱ्हाईकाच्या शोधात कधी ताटकळावे लागलेले दिसले नाही. भांडाराला सतत गिऱ्हाईक मिळत गेले. त्यातील मालाच्या सतत चर्चाही होत राहिल्या. अलिकडे गाडगीळांच्या सत्तरीनिमित्ते, तसा थोडा उशीरा म्हणजे ऑक्टोबर १९९७ मध्ये प्रसिद्ध झालेला, प्रभा गणोरकर संपादित 'गंगाधर गाडगीळ : व्यक्ती आणि सृष्टी' हा सहाशे पृष्ठांचा ग्रंथ त्याचेच उदाहरण म्हणायला हवे. यात ४५ लेखकांनी गाडगीळांच्या व्यक्तित्व व साहित्य याबद्दल लेख लिहिलेले आहेत. त्यांच्या व्यक्तिमत्त्वाबद्दल लिहिणाऱ्यांनी नोंदलेली काही मार्मिक निरीक्षणे बाजूला ठेवली (आणि ती तशी ठेवायलाच पाहिजेत. कारण 'उद्योजका'चे 'खाजगी, व्यक्तिगत' नव्हे तर, 'उद्योगी' व्यक्तित्त्व बघावे असे अर्थशास्त्र सांगते !) आणि साहित्याबाबतच्याही काही किरकोळ कुरबुरी टाळल्या तर चांगले 'इनपूट' आणि चांगली 'वर्कमनशिप' यामुळे गाडगीळांचे प्रॉडक्शन हे निश्चितच 'मार्केटेबल' झालेले आहे; इतकेच नव्हे तर, मार्केटमध्ये दबदबा निर्माण करणाऱ्या योग्यतेचे आहे, असाच निर्वाळा प्रस्तुत ग्रंथातील लेखकांनी दिलेला दिसतो.

मानवी जीवनव्यवहाराविषयी वाटणाऱ्या कुतुहलाची व्याप्ती, दर्जा व खोली, संवेदनामूलक निरीक्षणातील सूक्ष्मता, अनुभवांची योग्य निवड आणि त्यांची अर्थपूर्ण संगती लावण्याची क्षमता, रूपबंधाचे भान, एकूणच जीवनव्यवहार व साहित्यव्यवहार यांविषयीची काही एक वैचारिक भूमिका असूनही ती ललित साहित्यनिर्मिती करताना लपविण्याचे कसब, अनुभव व आविष्कार या दोन्ही बंधांना एकात्मरीत्या साक्षात् करणाऱ्या भाषेसारख्या साधनावरील प्रभुत्व आणि त्याला सौंदर्याचे वाहन करण्याचे कौशल्य अशा काही गोष्टी लेखकाच्या गुणात्मकतेचा विचार करताना लक्षात घेतल्या जातात. याबाबतीत गाडगीळांचे साहित्य प्रामुख्याने निर्देशित करीत असलेले महानगरी विश्व, महायुद्धोत्तर मध्यम वर्ग, त्यामागील लेखकाचे कुतुहल व्यक्तिमूलक की समाजमूलक, तसेच त्यामागील लेखकाचा अव्यक्त दृष्टिकोण किंवा भूमिका



अनुक्रमणिका






यांबद्दलचे काही प्रश्न निर्माण होतातच. पण ते इथे थोडेसे बाजूला सारले तर गाडगीळांचे साहित्य गुणवत्तेच्या कसावर उतरणारे आहे हे मान्य करावे लागते.

पण त्यांच्या लेखनाची गुणवत्ता एका वेगळ्याच विशेषात सामावलेली आहे असे वाटते. कलाकृती ही काही यांत्रिक निर्मिती नव्हे. म्हणजे वेगवेगळ्या घटकांची काही एका हिशेबी नियमानुसार केलेली बेरीज नव्हे. कांट या सौंदर्यशास्त्रज्ञाच्या मते कलाकृतीमागे ज्ञानशक्तींचा स्वैर वा मुक्त विलास कार्यरत झालेला असतो. त्यामुळे त्यात अनेकार्थतेची शक्यता जशी संभवते तशी तिच्या मर्माला भिडण्यासाठी अनेक मार्गांना आवाहन करण्याची क्षमतादेखील. जिथे अशा जास्त मार्गांची शक्यता असते ती कलाकृती आणि तिचा लेखक मोठा मानला जातो. थोडक्यात जास्त समीक्षा पद्धतींना डिवचणारे लेखन आणि त्यांचे लेखक मोठे असे म्हटले जाते. कारण ही गोष्ट त्या लेखनातील लवचिक सामर्थ्याचेच द्योतक असते. गाडगीळांचे लेखन या कसोटीवर उतरणारे आहे. प्रस्तुत ग्रंथ त्याचे उदाहरण ठरेल.

एक गोष्ट स्पष्ट आहे की सतत पन्नासेक वर्षे लक्षणीय लेखन केलेल्या आणि त्यामुळे समीक्षेला स्वत:ची दखल घेणे भाग पाडलेल्या गाडगीळांसारख्या लेखकाबाबत पूर्णपणे 'नवे' लिहिले जाणे कठीण आहे. त्यामुळे प्रस्तुत ग्रंथात परिचित निष्कर्ष वेगवेगळ्या संदर्भात भेटणे अपरिहार्य आहे. पण एक नक्की की या ग्रंथातील कुणाही लेखकाने जाता जाता सहज करावे असे 'कॅज्युअल' लेखन केलेले दिसत नाही. साठी-सत्तरी-पंच्याहत्तरी ओलांडणाऱ्यांच्या गौरवार्थ सिद्ध केल्या जाणाऱ्या ग्रंथात सर्वसाधारणपणे स्तुतीची, कौतुकाची मखमल पसरविण्याचा उद्योग केला जात असतो. पण गाडगीळांच्या दबदब्यामुळे असेल कदाचित्, असा प्रकार प्रस्तुत ग्रंथात झालेला दिसत नाही. मंगेश पाडगावकर किंवा उर्मिला राय यांचे 'व्यक्ती गाडगीळ' वरील लेख याबाबतीत पाहता येतील. 'साहित्यिक गाडगीळां' वरील लेखात अशा जागांची संख्या जास्त आहे. इथे गणोरकरांच्या संपादन-कौशल्याचा उल्लेख करायला हवा. '(गाडगीळांच्या) व्यक्तिमत्त्वाचा वेध घेणे ही वाङ्मयेतिहासाच्या दृष्टीने एक गरजेची गोष्ट आहे' असे जे त्यांनी 'भूमिके'त म्हटले आहे, त्याचे प्रत्यक्ष संपादनकार्यात विस्मरण होऊ दिलेले नाही. त्यांची 'भूमिका' म्हणजे गाडगीळांचे साहित्य, त्यांचा काळ आणि प्रस्तुत ग्रंथातील लेख-लेखक यांचा चांगला परिचय करून देणारा स्वतंत्र लेखच झालेला आहे. संपादक म्हणून त्यांनी लेखकांना दिलेली मोकळीक, आणि पुनरुक्ती व परस्परव्याप्ती शक्यतो टाळण्यासाठी घेतली गेलेली दक्षता यांचा इथे निर्देश करायला हवा.

ऐतिहासिक, संस्कारवादी, मानसशास्त्रीय, (मर्यादित स्वरूपात) चरित्रात्मक, आस्वादक, समाजशास्त्रीय अशा काही समीक्षापद्धतींना गाडगीळांच्या लेखनाने आवाहन केलेले दिसते. प्रा. रमेश तेंडुलकरांनी गाडगीळांच्या नवोन्मेषी प्रतिभेच्या वाटचालीचा एक सुरेख आलेख काढलेला आहे. गाडगीळांच्या युयुत्सू घडणीच्या संदर्भात त्या काळातील वाङ्मयीन पर्यावरणाचा, जुन्या-नव्यातील संघर्षाच्या काळांचा तेंडुलकरांनी नेमका निर्देश केलेला आहे. सुधा जोशी यांनी घेतलेला कथालेखनाचा आढावा, गो. मा. पवार यांनी विनोदी लेखनाचा आढावा घेत गाडगीळांच्या विनोदी-लेखनाची टिपलेली नेमकी 'विक्षिप्त' वैशिष्ट्ये, प्रल्हाद



अनुक्रमणिका

वडेर व वि. शं. चौघुले यांनी प्रवासवर्णनांविषयी केलेले विवेचन, सुखमणी राय यांचा लेख हे त्या त्या साहित्यप्रकारातील गाडगीळांचे ऐतिहासिक योगदान स्पष्ट करणारे लेख आहेत आणि परिचित निष्कर्ष हाती देणार असले तरी चांगले म्हणावेत असे उतरलेले आहेत. बाळ गाडगीळांनी गंगाधर गाडगीळांच्या विनोदी लेखनाविषयीच्या भूमिकेतील बदल नेमकेपणी टिपला आहे. अविनाश भडकमकरांनी गाडगीळांच्या बालविश्वाचे दर्शन घडविले आहे.

संस्कारवादी आणि आस्वादक या समीक्षेच्या दोन पद्धती म्हणजे जुळ्या वहिणीच म्हणता येतीलशा. या दोन्हीतील सीमारेषा खूपच धूसर. शामला वनारसे यांचा 'वाचकांची गोष्ट' हा लेख या वर्गात मोडेल असा आहे. गाडगीळांच्या सुप्रसिद्ध अशा 'लेखकाची गोष्ट'चे सूत्र मनात ठेऊनच या 'वाचकांची गोष्ट'ची निर्मिती झालेली आहे. त्यांच्या नव्या ढंगांच्या कथांनी वाचकांच्या मनावर केलेल्या परिणामाचे विवेचन यात येते. 'मुंबईकर' गाडगीळांची कथा 'पुणेकर' वाचकांपर्यंत कशी पोहोचत गेली हा एका नव्या वाङ्मयीन अभिरुचीच्या अभिसरणाचा प्रवास इथे दाखविला जातो. पण याचबरोबर गाडगीळांनी 'सिस्टिम शरणते'ला ट्रॅजेडी ठरवण्याचा नवा साचाच तयार केला, तसेच माणसावरील विश्वास वा सश्रद्धता यांचा काही नवा अर्थ दाखविला नाही, दाखविली ती फक्त कुरूपतेकडे पाहण्याची धिटाई असे काही आक्षेपही यात (वाचकांच्या वतीने) नोंदलेले आहेत. गो. पु. देशपांडे यांनी एक वेगळाच वादाला प्रवृत्त करील असा विचार मांडलेला दिसतो. त्यांच्या मते गाडगीळांनी एकच कथा लिहिली असून तिचीच अनेकं उपकथानके विखुरलेली दिसतात. विस्थापित ब्राह्मण हा त्यांच्या कथेचा नायक असून उपकथांमध्ये बदलत्या ब्राह्मण्याचे अर्थ लावलेले आहेत. त्यात कुटुंब व्यवस्थेचे विघटन दाखविले आहे. त्यांना आधुनिकतेचा क्षण पकडणे जमले असून त्यांच्या सुट्या कथा हा वास्तविक कादंबरीचाच ऐवज आहे. 'दोन मुंग्यांचे महाभारत' हा विजया राजाध्यक्ष यांचा लेख

***व्यामिश्र व समृद्ध व्यक्तिमत्त्व !***

*''ते (गंगाधर गाडगीळ) फार मनस्वी व कर्तव्यनिष्ठ आहेत. .... वाङ्मयक्षेत्रातले सार्वजनिक जीवन त्यांना नकोसे नसले तरी एकांतप्रिय आहेत. चारचौघात मोकळे असले, संभाषणचतुर असले तरी वेगळेपण सांभाळणारे आहेत. दुसऱ्याशी वागताना शिष्टाचारात चुकणार नाहीत, पण अंतर विसरणार नाहीत आणि त्याच्या कमी-अधिकपणाचा विवेक जागा ठेवतील. व्यवहारदक्षतेने माणसांशी संबंध राखतील. पण खोल निरागस सरलत्वाची त्यांना ओढ आहे... हिशेबी करडे व बिनचूक वागत असले तरी गाभ्यात हळवे आहेत... बुद्धिमान, संवेदनक्षम, चिकित्सक, प्रतिभावान, विविध अनुभवी तर आहेतच. फार व्यामिश्र व फार समृद्ध व्यक्तिमत्त्व त्यांचे आहे. म्हणून स्नेहदेखील...*

श्री. पु. भागवत

'गंगाधर गाडगीळ : व्यक्ती आणि सृष्टी' भूमिका : पृष्ठ आठ मधून

विशेष उल्लेखनीय आहे. मर्ढेकर आणि गाडगीळ या दोघातील वाङ्मयीन ऋणानुबंधाचा अतिशय उत्कट असा शोध यात घेतला गेला आहे. एरवी असे दिसते की गाडगीळ हे गाडगीळ म्हणून प्रस्थापित होऊ पाहात होते त्याच सुमारास मर्ढेकर कालवश झाले आहेत. १९५६ पर्यंत त्या दोघांनीही परस्परांच्या साहित्यावर एकेक लेख लिहिलेला आहे. दोन्ही 'सत्यकथे'तून प्रसिद्ध झालेले. जून १९४७ मध्ये मर्ढेकरांचा कथाकार गाडगीळांवरील लेख, तर जून १९५१ च्या अंकात गाडगीळांचा मर्ढेकरांच्या 'बन बांबूचे' या कवितेवरील 'आकाशातील अधोरेखिते' हा लेख. हे दोघेही एकाच नव्या वाङ्मयीन पर्यावरणाची अपत्ये होत. दोघेही आहे त्याबद्दल अस्वस्थ आणि साहित्यनिर्मितीबाबत नव्या शक्यतांचा शोध घेऊ पाहणारे. तेव्हा हे दोघेही तसे समानधर्मी म्हणता येतीलसे. इतक्या शिदोरीवर त्या दोघांसंबंधी लेख सिद्ध करताना विजयाबाईंना फार मोठ्या प्रमाणावर तर्क आणि कल्पनाशक्ती यांची मदत घ्यावी लागलेली आहे. पण त्यांनी या दोघांच्या भूमिकांच्या चौथऱ्यावरच प्रस्तुत लेखाचा इमला उभा राहतो आहे, याची दक्षता घेतलेली आहे. 'साहित्यातील क्रांतीचा जयजयकार आणि साहित्याच्या स्वातंत्र्याचाही जयजयकार' करणाऱ्या या दोन समकालीन समानधर्मींच्या वाङ्मयीन संबंधाचा त्यांनी अनेक अंगांनी मोठा श्रद्धापूर्वक, भक्तिभावपूर्वक शोध घेतलेला आहे. त्यांच्या मनावर झालेल्या या दोघांच्या संस्काराची एकवटलेली प्रतिमा म्हणजे प्रस्तुत लेख म्हणता येईल. पण इथे फक्त त्यांच्या समीक्षक म्हणून असणाऱ्या भूमिकांचाच विशेषत्वाने का विचार केला गेला आहे हे कळत नाही. गाडगीळ यांच्या कथा आणि मर्ढेकरांची कविता यांच्यातील ऋणानुबंधाचाही शोध घेता येईलसा आहे. इथे त्यांच्या दोघांच्या समीक्षा विचारांचा, तोही भावनात्मक शोध दिसतो. आत्मनिष्ठ ललित समीक्षेचे उदाहरण म्हणूनही याचा निर्देश करता येईल. काही त्रुटी, काही उणीवा इथे भावुक भूमिकाच उभ्या करीत असते. त्याकडे दुर्लक्ष करणे हेच योग्य होईल.

अशोक कृष्णाजी जोशी यांनी गाडगीळांच्या कथेवर 'एक सामाजिक दृष्टिक्षेप' टाकलेला आहे. त्यांना 'गाडगीळ यांच्या कथांचा मार्क्सवादी समीक्षा पद्धतीच्या दृष्टीने, अधिक काटेकोरपणाने म्हणावयाचे झाल्यास सामाजिक दृष्टीने विचार करणे ही कल्पनाच काहीशी विचित्र वाटणे शक्य आहे' असे वाटते. हे तितकेसे योग्य नाही. कारण मार्क्सवादी समीक्षेचा आखीवरेखीव सापळा गाडगीळांच्या कथेला लावण्याच्या प्रयत्नात कदाचित् बादरायणी विचित्र ओढाताण दिसेल, पण सामाजिक दृष्टीच्या बाबतीत तर तिच्याशिवाय गाडगीळांच्या कथाच नव्हेत, तर एकूण नवसाहित्याचा अन्वयार्थच लावणे अशक्य आहे. कारण महायुद्धोत्तर आणि समकालीन म्हटल्या जाणाऱ्या वास्तवाचा शोध घेण्यासाठीच या साहित्याची ख्याती आहे. मर्ढेकर-गाडगीळांच्या बाबतीत तो व्यक्तिकेंद्रित आहे. शरश्चंद्र मुक्तिबोधांप्रमाणे समष्टीकेंद्रित नाही, असे फार तर म्हणता येईल. माणसाला स्वत:चा चेहराच हरवायला लावणाऱ्या महानगरी वास्तवाचे गाडगीळांची कथा जागवीत असलेले भान मात्र अशोक कृष्णाजींनी नेमकेपणी टिपलेले आहे. याला जोडूनच अनंत देशमुखांचा 'गाडगीळांच्या कथेतील मुंबई' हा श्रमपूर्वक सिद्ध केलेला लेख लक्षात घ्यायला हवा. गाडगीळांच्या कथाविश्वाच्या भौगोलिक कक्षा स्पष्ट करणे, तपशीलाच्या नोंदी करणे हे विद्यापीठीय प्रबंध छापाचे किचकट काम. देशमुखांनी या

शारीर नोंदी मेहनतीने केलेल्या आहेत. 'गाडगीळांच्या लघुकथेतील निवेदक' हा हरिश्चंद्र थोरात यांचा अगदीच वेगळी व नवी भूमिका स्पष्ट करणारा लेख आहे. प्रथमपुरुषी निवेदक किंवा तृतीयपुरुषी निवेदक अशा परंपरागत दृष्टिकोनाचा अवलंब न करता गाडगीळांचा निवेदक 'निवेदक' म्हणून त्याचे कार्य कसे करतो, कोणत्या प्रकाराने भाष्ये करतो किंवा जीवनविषयक दृष्टिकोण कसा मांडतो' या सारख्या सूत्रांचा इथे आधार घेतलेला आहे. मराठी समीक्षेत हा

### *'वाङ्मयाच्या सर्व क्षेत्रांत अग्रेसर'*

*'कथा' हा साहित्यप्रकार मर्यादित अवकाशात उभा राहणारा, म्हणून मर्यादित जीवनानुभव कवेत घेणारा, म्हणून दुय्यम दर्जाचा आणि नियतकालिकांमुळे पोसला गेलेला आणि त्यांना पोसणारा साहित्यप्रकार असे म्हणून कथेला कमी लेखण्याचा एक तऱ्हेवाईकपणा अलिकडेच सुरू झाला होता. परंतु गाडगीळांच्या कथेकडे दृष्टिक्षेप टाकल्यास असे उच्चारणेदेखील चुकीचे ठरेल. गाडगीळांनी केवळ नियतकालिकांना पोसणारी कथा लिहिली नाही. विविध सामाजिक संदर्भात व समाजाच्या विविध थरात वावरणारी, अनेकविध प्रेरणांनी वागणारी माणसे, विविध प्रवृतींच्या, विविध थरांतल्या, विविध वयोगटातल्या स्त्रिया, विविध प्रकृतीची मुले तर त्यांच्या कथेत आहेतच, त्याचप्रमाणे नैसर्गिक आणि सामाजिक वातावरणाची; घटनांची विविधता, असंख्य प्रकारचे अनुभव, पात्रांच्या मनोव्यापारांचे, लकबींचे, गुणविशेषांचे गणित, तपशील यासंबंधीचे सूक्ष्म चित्रण करणाऱ्या शेकडो कथा त्यांनी लिहिल्या. अनुभवाचा एवढा विस्तीर्ण परीघ, इतकी सूक्ष्म संवेदनक्षमता आणि कल्पकता आणि निवेदनाच्या इतक्या परी गाडगीळांच्या कथेत आढळतात की गाडगीळांनी 'कादंबरी' हे आपल्या कर्तृत्वाचे क्षेत्र ठरविले नाही असा 'आक्षेप' त्याच्याबाबत घेणेही हास्यास्पद ठरावे ! गाडगीळ हे गेल्या पिढीतले लेखक असूनही नंतरच्या काळात प्रभावी ठरलेल्या अनेक प्रेरणांचे त्यांनी जे दर्शन घडवले आहे, ते त्यांच्यातल्या प्रतिभावंताच्या काळातील संवेदनशीलतेचे द्योतक म्हणता येईल. पुढे जी. ए. कुलकर्णी यांच्या कथेने जिचा विलक्षण पिसारा उभा केला ती अनोखी प्रतिमासृष्टी किंवा पुढे दिलीप चित्रे यांच्या कथेने जिचे अस्वस्थ करणारे दर्शन घडवले ती अस्तित्ववादी परमात्मा यांचे मूळ दर्शन गाडगीळांच्या कथेने कितीतरी पूर्वी घडवले होते हे ध्यानात ठेवले पाहिजे. वाङ्मयाच्या सर्व क्षेत्रात सर्वार्थाने अग्रेसरत्व दाखवणारा लेखक म्हणून गाडगीळांच्या सर्व निर्मितीकडे पुन्हा एकदा नव्याने पाहणे, ही गोष्ट आज महत्त्वाची ठरते ती त्यामुळेच.*

प्रभा गणोरकर

'गंगाधर गाडगीळ : व्यक्ती आणि सृष्टी' भूमिका : पृष्ठ तेरा मधून

प्रयत्न अगदी नवा आहे.

म. सु. पाटील आणि शैला पाटील यांनी अनुक्रमे 'ज्योत्स्ना आणि ज्योती (नाटक)' आणि 'लिलीचे फूल (कादंबरी)' या मूळ एकाच अनुभवाला फुटलेल्या दोन साहित्यकृतींच्या संदर्भात मानसशास्त्रीय समीक्षा पद्धतीचा अवलंब करून दोन लेख सिद्ध केलेले आहेत. या पद्धतीच्या लेखनात संहितेचा सूक्ष्म, चिकित्सक अभ्यास ही अत्यंत आवश्यक गोष्ट असते. कारण कथाव्यूहातील जाणिवेच्या पातळीवरून टिपल्या जाणाऱ्या कृतीउक्तींची नेणिवेतील मुळे इथे शोधविषय बनत असतात. शिवाय समीक्षकाला वाटले म्हणून साहित्यकृतीच्या अंतरंगात शिरण्यासाठी मानसशास्त्रपूत मार्ग घेतला असा प्रकार इथे कामाचा नसतो. त्या साहित्यकृतीची ती मागणी असावी लागते. प्रस्तुत कादंबरी व नाटक अशी मागणी करणाऱ्या साहित्यकृती निश्चितच आहेत. (वसंत आबाजी डहाके यांनी आपल्या लेखात 'गाडगीळ यांनी या नाटकात एका मानसिक समस्येला नाट्यरूप दिलेले आहे' असे सांगून त्याचे मनोविश्लेषणात्मक, मानसशास्त्रीय नव्हे, स्पष्टीकरण दिलेले आहे. पण ज्योत्स्ना आणि ज्योती यांच्या कृतीउक्ती अशा जगावेगळ्या का याचा खोलात उतरून धांडोळा घ्यायला हवा असे त्यांना वाटलेले दिसत नाही. जाणिवेच्या पातळीवरच याचे उत्तर ते शोधू पाहतात आणि 'ज्योत्स्नाच्या मानसिक विकृतीपासून सुरू झालेले हे नाटक आध्यात्मिक प्रश्नाला स्पर्श करू लागते' अशा न पटणाऱ्या निष्कर्षापर्यंत येतात!) म. सु. पाटील व शैला पाटील यांनी libido किंवा रतिभाव याचे सूत्र पकडून या दोन्ही साहित्यकृतीतील कृतीउक्तींचा किंवा एकूण कथाव्यूहाचा उलगडा चांगला केला आहे. पण या दोघांनाही कदाचित् जाणवून गेलेल्या गोष्टीचा निर्देश करायचा तर प्रस्तुत साहित्यकृती वाचताना लेखकाने जाणीव व नेणीव यातील संबंध फारच हिशेबीपणाने कल्पिलेले आहेत, असे वाटत राहते. असे वाटण्याला गाडगीळांची प्रतिमांकित काव्यात्म भाषा, संवेदनाजनित वर्णनशैली जास्त उठावदार झाल्यामुळे मदत करतात. हे काहीही असले तरी १९५५ साली 'लिलीचे फूल'च्या निमित्ताने गाडगीळांनी स्वीकारलेला कादंबरी लेखनाचा मार्ग असाच पुढे चालू ठेवला असता तर त्यांना नवकादंबरीचे प्रणेते असेही म्हणता आले असते!

गौरी देशपांडे आणि माया पंडित यांचे प्रस्तुत ग्रंथातील लेख आवर्जून वाचावेत असे आहेत. गाडगीळ-भक्तांना ते त्रासदायक वाटतील, पण त्यांचा मतितार्थ खोडणे त्यांनाच नव्हे तर वादकुशल गाडगीळांनाही शक्य होणार नाही. त्यांनाही हे जाणवेल की कळत-नकळत आपल्यात मुरलेल्या व आपल्या झालेल्या (म्हणून त्यापासून पळवाट नसलेल्या) एका मर्म-केंद्रावर होणारा हा आघात आहे. त्यांच्या कथांविषयीची 'काही निरीक्षणे' नोंदताना गाडगीळांच्या भाषेचे नाविन्य वगैरेचे कौतुक करतानाच गौरी देशपांड्यांनी फक्त परंपरागत, बंड नाकारणाऱ्या स्त्रीचेच चित्रण गाडगीळांनी केलेले आहे ही वस्तुस्थिती सप्रमाण विशद केलेली आहे. 'कॉलेजात शिकलेल्या आणि नोकरी करणाऱ्या स्त्रियांबद्दल ते सतत तुच्छतेने किंवा व्याजोक्तीने का बोलतात हेही एक गूढच आहे' असे त्यांनी स्पष्टपणे म्हटलेले आहे. ही स्त्रीवावतची दृष्टी म्हणजे गाडगीळांचा अंधबिंदू (blind spot) असल्याचे त्यांनी सूचित केले आहे. शिवाय आपण जे जे लिहिले आहे, त्यातील बऱ्या-वाईटाचा स्वत: (समीक्षकही



अनुक्रमणिका

असलेल्या) गाडगीळांनी विचार न करता सरसकटपणे छापले ते संग्रहीत केले; असा प्रकार केल्याबद्दल, बेफिकीरी दाखविल्याबद्दल तीव्र नाराजी व्यक्त करताना त्या लिहितात, 'ती (बेफिकीरी) पाहून या गुरुदेवांच्याही मातीच्या पायांची माझ्यासारखीला जी जाणीव होते ती तापदायक ठरते.'

माया पंडित यांनी गाडगीळांनी केलेल्या स्त्री-चित्रणावरच आपला लेख उभा केला आहे. त्यांनी स्त्रीवादाच्या संदर्भात केल्या जाणाऱ्या लेखनाचे अगदी मुद्देसूद विवेचन केले आहे. साधारणत: त्यांना स्त्रीचे चित्रण चार मार्गांनी होताना दिसते. १) साचेबंदिस्तता-कुटुंब, घर या संदर्भातील स्त्रीविषयीच्या परंपरागत कल्पना. २) स्त्रीबाबतची भरपाईची जाणीव — तिचा फुकाचा गौरव करणे, गोडवे गाणे हा सत्तासंबंधातील 'राजकीय खेळ'च. ३) सहकार्य - यातही दमनाला स्त्रीची अनुमती कल्पिणे व मिळविणे. (ग्रांची या मार्क्सवादी समीक्षकाची

**_'निवेदकाचे अस्तित्व'_**

*कथनात्म माहितीचे नियंत्रण करण्याचा पहिला प्रकार म्हणजे जी घटना निवेदन करायची आहे, तिचा निवेदकाकडून कमी किंवा अधिक तपशील पुरविला जाणे. निवेदकाने जाणवेल असा हस्तक्षेप करून घटना थोडक्यात सांगण्याचा प्रयत्न केला की तपशील कमी पुरविला जातो. घटनेचा तपशील वाढू लागला की निवेदकाची मध्यस्थी कमी जाणवू लागते.*

*'गावातल्या हॉटेलात जाऊन त्याने चहा घेतला आणि त्याचे पैसे मागितल्यावर तो दुकानदाराच्या अंगावर शिव्या देत धावून गेला !'*

*गाडगीळांच्या 'लांडगे'मध्ये निवेदकाने कथन केलेली ही एक घटना आहे. एका बऱ्याच मोठ्या घटनेचे निवेदन निवेदकानें एका वाक्यात येथे केले आहे. पण हीच घटना बारीक सारीक तपशीलासह उभी करता येते. हॉटेलचे स्वरूप, 'त्या'चे हॉटेलमध्ये प्रवेश करणे, चहा मागवणे, चहा येणे, दुकानदाराने पैसे मागणे, त्याच्या शिव्या आदि तपशील मोठ्या प्रमाणात देणे शक्य असते. पण अशा प्रकारे तपशीलासह ही घटना उभी राहिली तर वरच्या एका वाक्यातून सारांश करणारा म्हणून निवेदकाची जशी जाणीव होते, तशी तपशील वाढला की होणार नाही. निवेदकाची जाणीव अस्पष्ट करणारे तपशीलवार चित्रण गाडगीळांचा निवेदक सर्वसाधारणपणे करत नाही. गाडगीळांची लघुकथा वाचताना निवेदक पडद्याआडून सूत्रे हलवतो असे कधीही वाटत नाही. त्याचे अस्तित्व तो करत असलेल्या घटनांच्या साररूपामुळे सतत ठसठशीतपणे जाणवत राहते.*

हरिश्चंद्र थोरात

गाडगीळांच्या लघुकथेतील निवेदक

'गंगाधर गाडगीळ : व्यक्ती आणि सृष्टी' पृष्ठ २६९



अनुक्रमणिका

हेजिमनीची संकल्पना इथे लक्षात घेता येईल !) ४) (महत्त्वाचे पुरुषी हत्यार म्हणजे) विपर्यास. स्त्रीने नव्याने सुरू केलेल्या संघर्षाची (counter-hegimony ची) खिल्ली उडविणे. ही सर्व नकारात्मक भूमिका होय. (गाडगीळांनी केलेले स्त्रीचित्रण या मार्गांवरूनच वाटचाल करणारे आहे.)

पंडितांच्या मते गाडगीळांच्या कथेत कुटुंबांतर्गत आणि कुटुंबाबाहेर पडलेल्या, असे स्त्रियांचे दोन वर्ग दिसतात. यातील कुटुंबांतर्गत स्त्रीकडे पाहण्याचा गाडगीळांचा दृष्टिकोण 'समताधिष्ठित' नाही. तो 'व्यक्तिवादी आत्मतुष्टते'चा; तर 'कुटुंबाबाहेर पडून काही करू इच्छिणाऱ्या - नोकरी वा शिक्षण घेऊ इच्छिणाऱ्या - नव्या जीवनवाटा चोखाळणाऱ्या स्त्रियांकडे पाहण्याचा त्यांचा दृष्टिकोण हा केवळ प्रतिगामी व सरंजामी आहे असेच दिसते.' गाडगीळांच्या अतिशय गाजलेल्या 'तलावातले चांदणे' या कथेबाबत माया पंडित यांनी केलेले या अर्थाचे विवेचन मुळातूनच बघायला हवे. शेवटी त्यांनी आधुनिकतावादी म्हटल्या जाणाऱ्या गाडगीळांसारख्या लेखकाच्या 'आधुनिकतेतील अंतर्विरोधा'वरच नेमकेपणी बोट ठेवले आहे. या दोघींच्याही लेखनाचा एक विशेष असा की त्यांनी गाडगीळांच्या स्त्रीविषयक भूमिकेवर केलेले आघात आक्रस्ताळी नाहीत.

'एका मुंगीचे महाभारत' हे गाडगीळांचे आत्मचरित्र म्हणजे मराठी साहित्याच्या वाटचालीवरील एक समर्थ भाष्यग्रंथच आहे. स्वातंत्र्योत्तर काळात मराठीत कधी नव्हे असे जुन्या-नव्यांच्या संघर्षाचे महाभारत घडले. एका दृष्टीने हा दोन वाङ्मयाभिरुचींमधील, पुणे-मुंबईतील संघर्ष होता. गाडगीळांनी नव्याच्या बाजूने यात योद्धा म्हणून महत्त्वाची कामगिरी केली होती. तेव्हा व्यक्तिजीवनाबरोबरच १९८० च्या आधीच्या पन्नासेक वर्षांतील समाजजीवन व साहित्यजीवन यांचा गाडगीळांच्या चष्म्यातून काढला गेलेला आलेख म्हणजे हे आत्मचरित्र होय. चंद्रकांत बांदिवडेकर आणि गिरीश दाबके यांचे यावरील दोन लेख प्रस्तुत ग्रंथात आहेत. तशा या दोन्ही समीक्षकांच्या भूमिका आस्वादकाच्याच आहेत, असे म्हणता येईल. दाबके यांची दृष्टी जरा जास्त 'सामाजिक व समावेशक' दिसते. ' हे आत्मचरित्र जसे एका कर्तृत्ववान व्यक्तीचे आहे, त्याहूनही अधिक एका कलावंताचे आहे' असे सांगून बांदिवडेकर त्यांना विशेषत्वाने भावलेले एक वैशिष्ट्य सांगतात. ते म्हणजे 'गाडगीळांचे हे आत्मचरित्र म्हणजे एका कलावंताच्या स्वत्वाचा उत्कटतेने घेतला गेलेला शोध आहे.' दाबक्यांचा कटाक्ष गाडगीळांनी मार्क्सवादी समीक्षेला केलेल्या विरोधावर दिसतो. तत्त्व म्हणूनही समाजवादाला विरोध करणाऱ्या गाडगीळांचे त्यांना मोठे कौतुक वाटताना दिसते. समाजवादाला विरोध म्हणजे हिंदुत्ववादाचा स्वीकार ठरावा अशी सूचना दाबक्यांचे लेखन देते असे वाटते. त्यांना 'दुर्दम्य'चे यासाठीच कौतुक वाटलेले आहे की काय कुणास ठाऊक ! कारण 'दुर्दम्य'वर झालेल्या प्रतिकूल टीकेमागे 'समाजवादी वृत्ती' असल्याचे त्यांचे मत आहे. या भरात त्यांना 'गाडगीळांना असे सुचवावेसे वाटते की, 'दुर्दम्य'सारखी एक मोठी कादंबरी त्यांनी सावरकरांच्या जीवनावर अवश्य लिहावी.' पण 'टिळकांपेक्षाही अधिक व्यापक असे सद्यःकालीन संदर्भ' असे या सूचनेमागचे म्हणून जे कारण दाबके सांगतात, तेच ध्यानी घ्यायचे तर गाडगीळांनी

समकालीन असे दुसरे हिंदुहृदयसम्राट का निवडू नयेत? त्यामुळे मोठा लाभही होईल. अर्थात गाडगीळांना हे कुणी सुचविण्याची आवश्यकता नाही! आत्मचरित्रावावत शेवटी असे म्हणावेसे वाटते, की हा सर्व काळ जाणणाऱ्या एखाद्या माहितगाराकडून 'एका मुंगीचे महाभारत'मधील तपशीलाची छाननी व्हायला हवी होती. कारण चरित्र-आत्मचरित्रात नाही म्हटले तरी 'प्रत्यक्ष सत्य' हे मूल्य म्हणून ध्यानी यावे लागते. 'एका मुंगीचे महाभारत'मधील सत्याचे नेमके स्वरूप अशा विश्लेषणाशिवाय नेमकेपणी स्पष्ट होणे कठीण आहे.

'चरित्रविषय जितका वाचकांच्या परिचयाचा तितका चरित्रात्मक कादंबरी लिहिण्याचा प्रश्न मोठा' असे चंद्रकांत बांदिवडेकरांनी 'दुर्दम्य'बद्दल लिहिताना म्हटलेले आहे. इथे 'प्रश्न सोपा' असे म्हणता येण्याची शक्यताही दृष्टिआड करता येत नाही. कारण अशा लेखनाचा विषय झालेली व्यक्ती आधी मान्य झालेली असल्यामुळे जनमानसात स्वतःची एक प्रतिमा निर्माण करून राहिलेली असते. तिच्या चरित्रात्मक साधनांची बऱ्यापैकी जुळवाजुळव आणि ललित

**'विनोदात्म चित्रण'**

*विक्षिप्ताच्या स्वरूपाचा विनोद निर्माण करण्याचे मोठे सामर्थ्य गाडगीळांच्या विनोदात्मक प्रतिभाधर्मामध्ये आहे. याचे प्रत्यंतर त्यांनी लिहिलेल्या बंडूशिवायच्या अन्य कथांमध्येही पाहवयास मिळते. 'बुगडी माझी सांडली ग' या संग्रहातील त्या शीर्षकाचीच कथा, 'भगवंतराव टाळी वाजवितात' ही कथा या प्रकारच्या कथांची उत्तम उदाहरणे होत. 'बुगडी माझी' यासारखे एखादे गाणे सतत ऐकून वैतागल्यामुळे माणसाच्या मनात कशा विक्षिप्त कल्पना निर्माण होतात, याचे विनोदात्म चित्रण या कथेत गाडगीळांनी केले आहे. या कथेला त्यांनी मुक्त विनोदात्म स्वरूप दिले आहे. 'बुगडी माझी सांडली ग' हे गाणं म्हणणारी, जिची बुगडी हरवली आहे, अशी तरुण स्त्री साक्षात निवेदकापुढे उभी ठाकते व मग तिच्या सांगण्यावरून निवेदक बुगडीचा शोध कसा घेतो, हरवलेल्या बुगड्या लफ्फेदार फेट्यात कशा सापडतात, कधी कधी बुगडीच्या शोधात गेलेला आख्खा पोलीसच कसा हरवतो, वगैरे घटनांचे मजेदार वर्णन करून त्याच दाखविलेल्या हुशारीबद्दल त्याला 'अतिविचित्र सेवा पदक' हा किताब कसा मिळतो, वगैरे घटनांचे चित्रण येते व त्याची ही कर्तबगारी नारदमुनींच्याकडून पार्वतीला कळल्यामुळे नाहीशा झालेल्या शंकराचाही शोध घेण्याची कामगिरी त्याला कशी करावी लागते वगैरेचे विनोदात्म चित्रण या कथेत येते. फँटसीचा उपयोग या कथेत केला असला तरी तिला प्राधान्याने विक्षिप्तांच्या कथेचेच स्वरूप प्राप्त होते.*

गो. मा. पवार

'मराठी विनोदाची परंपरा आणि गाडगीळांचे विनोदी लेखन'

'गंगाधर गाडगीळ : व्यक्ती आणि सृष्टी' पृष्ठ २७५

लेखनाचा उत्तम सराव व जाण यांच्या जोरावर चरित्रात्मक कादंबरीचे अगदी श्रेष्ठ दर्जाचे नसले तरी परिणामकारक लेखन होऊ शकते. मराठीतच काही मान्य अशा पौराणिक वा ऐतिहासिक व्यक्तींवर लिहिलेल्या चरित्रात्मक कादंबऱ्या मोठी लोकप्रियता मिळवून गेलेल्या आहेत. आणि अनुभवही असा आहे की या परिणामकारकतेतील पन्नास टक्के काम या व्यक्तींच्या मूळ चारित्र्यानेच साधले आहे. (म्हणून अनेकदा असे वाटते की ज्यांना या व्यक्ती फारशा ठाऊक नाहीत अशा वाचकांच्या प्रतिक्रियांचा शोध घ्यावा. त्यातून दिसणारा कौल कादंबऱ्यांच्या मूल्यमापनाच्या दृष्टीने महत्त्वाचा ठरेल. 'ॲगनी अँड एक्स्टॅसी', 'लव्ह ईज इटर्नल', किंवा 'लस्ट फॉर लाईफ' यासारखे लोकप्रिय म्हटले जाणारे सर्वपरिचित लेखन मायकेल अँजेलो, अब्राहाम लिंकन किंवा व्हॅन गॉफ या व्यक्ती फारशा परिचयाच्या नसल्या तरी अन्य भाषिकांबाबतही का परिणामकारक ठरते? आपल्याकडे लिहिले गेलेले असे लेखन इतके परिणामकारक ठरू शकेल काय?)

या चरित्रात्मक कादंबरीच्या निमित्ताने बांदिवडेकरांनी आस्वादक समीक्षेचा चांगला नमुना पेश केला आहे हे खरे. पण हेही खरे की गाडगीळांनी त्यांना जसे आणि जितके टिळक समजले ते अगदी सराईतपणे कादंबरीच्या मखरात बसविले आहेत. कादंबरी या रूपबंधाच्या दृष्टीने आवश्यक असणाऱ्या घटकांची चांगली म्हणू अशी रचनाही साधलेली आहे. प्रश्न आहे तो चरित्र नायकाच्या व्यक्तिमत्त्वाच्या आकलनाचा. याबाबतीत प्रस्तुत ग्रंथातला स. ह. देशपांडे यांचा लेख अवश्य वाचावा अशा योग्यतेचा आहे. स्वत: देशपांडे साहित्याचे जाणकार वाचक आहेत. गाडगीळांच्या साहित्यावर प्रेम करणारे त्यांचे मित्रही आहेत. मुख्य म्हणजे 'समाजवादी दृष्टी'वाले नाहीत ! त्यांनी नेमकेपणाने आकलनातील त्रुटी किंवा चुकलेल्या दिशा साधार दाखवून दिल्या आहेत. पण टिळकांच्या व्यक्तिमत्त्वाच्या आकलनातील त्रुटीचे कारण लेखकाची कमी कुवत हे नसून त्याच्या व्यक्तिमत्त्वाचे भिन्न विशेष हे आहे. त्यामुळे 'दुर्दम्य'मध्ये भव्यता जाणवत नाही.

देशपांड्यांना गाडगीळांच्यात 'कोरडेपणा', 'अनुदात्तीकरण प्रवृत्ती' किंवा 'सिनिसिझम' हे उपयुक्ततावादी अर्थशास्त्रातील एका विचारधारेचे विशेष जाणवतात. म्हणून त्यांचा सवाल असा की, 'असा माणूस टिळकांशी आपली तार जोडू शकेल काय?' कारण त्यांच्या मते 'देशहिताची अहर्निश जाळणारी चिंता आणि धर्मप्रवण वृत्ती यांचं एकजीव रसायन टिळकांच्या जीवनात तयार झालेलं होतं.' त्यामुळे कादंबरीत फक्त 'दिसतात ते बव्हंशी 'दुर्दम्य' टिळक... टिळकांच्या स्वभावाच्या या बाजूचंच आकर्षण गाडगीळांना अधिक वाटलं असं दिसतं. आणि त्यांच्या तेजस्वितेचंही'... 'पण टिळकांच्या दुर्दम्यपणामागं ज्या उदात्त ऊर्मी होत्या त्यांची चाहूल गाडगीळांनी दिली नाही, कारण टिळक पूर्णपणे त्यांच्या आकलनाच्या टप्प्यात आलेच नाहीत.' असे सांगून 'गाडगीळांची लेखनशैलीही लेखन विषयाशी सुसंवादी' झालेली नाही, असाही देशपांडे आपला अभिप्राय नोंदवितात.

हे सर्व स्पष्ट करून देशपांडे पुढे लिहितात, 'असं त्यांनी का केलं? तर आपल्याला सगळं काही करता यायला पाहिजे, किंवा येतं असा हट्ट हे याचं कारण असावं.'

नरेंद्र जाधव आणि नरेंद्र रामकृष्ण साखळकर या अर्थतज्ज्ञ डॉक्टरद्वयाने गाडगीळांच्या अर्थशास्त्रलेखनाचा ऊहापोह दोन लेखांत केलेला आहे. दोघांनीही गाडगीळांच्या रंजक 'हसत खेळत अर्थशास्त्र' पद्धतीचा निर्देश केला आहे. गाडगीळ यांनी शासनाच्या समाजवादी धोरणाला केलेला विरोध, स्पर्धेची सांगितलेली आवश्यकता, ग्राहक चळवळ वगैरे विषयांवरील गाडगीळांच्या मतांचा उत्तम परिचय यातून घडतो. पण राजगोपालचारी, मसानी, पिलू मोदी, एन्. दांडेकर आणि अगदी आपल्या मराठीतले शरद जोशी वगैरेंनी नेहरूंच्या समाजवादी म्हटल्या जाणाऱ्या 'परमिट-लायसन्स राज्या'ला जो विरोध केला आणि भूमिका मांडली त्याहून गाडगीळ मांडीत असलेल्या भूमिकेत नेमके वेगळे काय आहे, हे स्पष्ट होत नाही. शिवाय इतरांचे साधे नामोल्लेखही झालेले नसल्यामुळे 'गाडगीळच काय ते एकटे असा विचार मांडणारे' असा मराठी साहित्यप्रेमींचा गैरसमज होण्याचा धोका आहे. हाच प्रकार खुल्या अर्थव्यवस्थेबाबत दिसतो. गाडगीळ हे जणू काही या व्यवस्थेचे नांदी-गायक असा सूर या

### *'नवनिर्मिती !'*

*गाडगीळांनी जुन्या साहित्यकृतीविषयी लिहिताना त्या त्या वाङ्मयप्रकारचे अंत:सत्व जसे शोधले आहे, तसेच त्यांच्यातील 'नवनिर्मिती'चाही वेध घेतलेला आहे. त्यांच्या मते ''नवनिर्मिती अनेक प्रकारची असते. ...प्रत्येक नवनिर्मितीत वैचारिक बंडखोरी असतेच असं नाही, ती असली तरी अनेकदा ते नवनिर्मितीचं प्रधान अंग नसतं. भाषेची अगर रचनेनी रूढ जडणघडण न मोडताही तिच्याद्वारे वेगळा अगदी नवीन आशय व्यक्त होऊ शकतो.'' (प्रतिभेच्या सहवासात) एखादी विशिष्ट वाङ्मयीन परंपरा अस्तित्वात असताना नवे साहित्य त्या परंपरेत स्वत:चे स्थान कसे निर्माण करते हे त्यांनी केशवसुत व मर्ढेकर यांच्या कवितेच्या संदर्भात पाहिलेले आहे. केशवसुतांनी आणि मर्ढेकरांनी मराठी कवितेच्या स्वरूपात मूलभूत बदल घडवून आणला. काव्याचे विषय, काव्याची रचना, काव्यातील प्रतिमा, काव्याची भाषा यांच्याविषयीचे अनेक रूढ संकेत मोडून टाकले. याप्रकारे त्यांनी आधीच अस्तित्वात असलेल्या परंपरेची चौकट मोडून टाकली आणि ती परत नव्याने सांधून घेतली. जुनी परंपरा, परिवर्तन आणि नवी परंपरा असा क्रम संस्कृतीप्रमाणे साहित्यक्षेत्रातही असतो. गाडगीळांनी निवडलेल्या सर्वच साहित्यकृती वाङ्मयीन परंपरा मोडून टाकणाऱ्या आहेत असे नाही, मात्र त्या वाङ्मयीन परंपरेच्या महत्त्वाच्या टप्प्यावरच्या आहेत, यात संदेह नाही.*

वसंत आबाजी डहाके
गाडगीळ यांचे साहित्य : उत्तरपर्व
'गंगाधर गाडगीळ : व्यक्ती आणि सृष्टी' पृष्ठ ५६३



अनुक्रमणिका





ग्रंथातील अनेकांनी लावला आहे. गाडगीळांना अभिप्रेत आहे ती भांडवलशाही अर्थव्यवस्था की खुली अर्थव्यवस्था याचाही विचार व्हायला हवा होता असे वाटते. कारण खुल्या अर्थव्यवस्थेला नियंत्रित (समाजवादी) व्यवस्था आणि भांडवलशाही व्यवस्था या दोघांचाही प्रारंभी विरोध होता हे डंकेलप्रणित गॅट कराराच्या निमित्ताने जी जगभर चर्चा झाली त्यातून स्पष्ट झालेले आहे.

आणखी एका गोष्टीबद्दलचे आश्चर्य इथेच नोंदवायला हवे. वास्तविक भारत हा कृषिप्रधान देश. इथली मोठी जनसंख्या आणि राष्ट्रीय उत्पन्नाचा मोठा हिस्सा कृषिउत्पादनाशी निगडित असलेला. पण गाडगीळांच्या अर्थविषयक विचारात शेतीचा फारसा विचार का झालेला नाही? यंत्रोद्योग, तेथील उत्पादन, नाना उद्योगसमूह, बाजारपेठा, स्पर्धा, टिकून राहण्यासाठी किंवा पुढे येण्यासाठी आवश्यक असलेले (सरकारी) नियंत्रणरहित स्वातंत्र्य, भांडवलनिर्मिती वगैरे अत्यंत आवश्यक गोष्टी शेतीला परावलंबी ठेऊन आपल्या देशात शक्य होतील काय याचा विचार कुठे झालेला नाही. साखळकरांनी ज्या 'इंडिया-भारत'वाल्या शरद जोशींचा उल्लेख केला आहे, त्यांच्या अशाच एका प्रसिद्ध शब्दाचा वापर करून बोलायचे तर असे म्हणता येईल की, ही सारी 'काळ्या इंग्रजां'ची भलावण वाटते ! आणि एखाद्या गिरीश दाबके यांच्या भूमिकेत जाऊन (गाडगीळांच्याच) 'हसत खेळत गमती'च्या शैलीत मौजेने म्हणता येईल की, अर्थज्तज्ञ गाडगीळांनी या भूमिकेच्या शिदोरीवर एखाद्या राजीव दीक्षित किंवा मुरली मनोहर जोशींच्या स्वदेशी दिंडीत सामील व्हावे. तिथेही त्यांना वरिष्ठ सल्लागाराचे स्थान नक्की मिळेल !

प्रस्तुत ग्रंथातील समीक्षक गाडगीळांवरील तीन लेखांचा गट महत्त्वाचा आहे. भारती निरगुडकर यांचा 'एक सर्वांगीण दृष्टिक्षेप' गाडगीळांच्या समीक्षा-लेखनाचा चांगला परिचय करून देतो. सूक्ष्म व विविधांगी, समीक्षा विषयाचा इतरांहून नेमका वेगळेपणा शोधण्याचा यत्न, कलाकृतीतील भावविश्वाशी समरसता, सुबोध भाषा अशी गाडगीळांच्या समीक्षापद्धतीची वैशिष्ट्ये त्यांनी साधार स्पष्ट केलेली आहेत. अनुभवांच्या घटकांच्या संघटनातत्त्वानुसार साहित्यप्रकार मानावेत या गाडगीळांच्या साहित्य प्रकारविषयक भूमिकेचा त्यांनी निर्देश केलेला आहे. मिलिंद मालशे यांनी तर गाडगीळांच्या प्रकारविषयक विचारावरच लेख लिहिलेला आहे. नेमकेपणाने याबाबतीत गाडगीळांच्या समीक्षेतील गोंधळ त्यांनी दाखविला आहे. साहित्याबद्दलची गाडगीळांची भूमिका कलावादी किंवा आस्वादकाची. ही भूमिका साहित्याचे अनन्यत्व मानणारी. म्हणजेच साहित्याचे प्रकारात वर्गीकरण नाकारणारी. पण साहित्यातील 'मानदंडां'चा विचार मात्र गाडगीळांनी साहित्यप्रकारांच्या साहाय्यानेच केलेला आहे. 'गाडगीळांच्या प्रत्यक्ष समीक्षेमध्ये साहित्यप्रकारांच्या संकल्पनेला मूलभूत असे स्थान आहे, असे स्पष्टपणे दिसते,' याबरोबरच 'नवटीकाकारांपूर्वीच्या समीक्षकांचा साहित्यप्रकारांच्या बाबतीत गोंधळ उडालेला आहे हा मुद्दा गाडगीळांनी मांडलेला आहे. परंतु त्यांनी नवसमीक्षेमध्ये साहित्यप्रकारांची काही नवीन प्रकारे व्यवस्था लावलेली आहे, असे आढळत नाही,' ही मालश्यांची निरीक्षणे महत्त्वाची ठरतात. त्यांनी स्पष्टपणे असाही निर्वाळा दिलेला आहे की,

'पाश्चात्य समीक्षेच्या परंपरेमध्ये न्यू क्रिटिसीझम या रूपवादी नवसमीक्षाप्रणालीनंतर आलेल्या संरचनावादी समीक्षेने त्यांच्याकडे (म्हणजे प्रकारव्यवस्थेकडे) लक्ष पुरविलेले आहे. गाडगीळांच्या नवसमीक्षेमध्ये साहित्यप्रकारांच्या व्यवस्थित तात्त्विक मांडणीला अजिबातच महत्त्व दिलेले नाही.'

कांट-क्रोचे आदी अ-लौकिकतावादी सौंदर्यमीमांसकांनी कलाकृतीच्या अनन्यसाधारणत्वाचा मुद्दा मांडून साहित्यप्रकारांच्या परंपरागत मान्य संकल्पनेला जसे आव्हान दिले तसेच ते श्रेणीतत्त्वालाही दिले. त्यामुळे दोन कलाकृतींमधील, लेखकांमधील, साहित्यप्रकारांतील तुलना-उच्चनीचता विचार इत्यादींना सरावलेल्या समीक्षेच्या मार्गात अडचणी उभ्या राहिल्या. पण

**_समीक्षेचा सृजनशील बाज !_**

*गाडगीळ व मर्ढेकर हे दोघेही सृजनशील कलावंत होते. तसे विचक्षण समीक्षकही. या दोन्ही भूमिका त्यांनी समांतरपणे बजावल्या आणि नवसमीक्षेला प्रतिष्ठा प्राप्त करून दिली. त्यांच्या समीक्षेची स्वरूपे वेगवेगळी होती. मर्ढेकरांनी आरंभी काही लेखक, काही पुस्तके यांच्यावर लिहिले खरे. पण हा काळ उलटल्यानंतर त्यांची समीक्षा प्रामुख्याने सौंदर्यशास्त्रातच गुंतली. तिचे स्वरूप मूलतः तात्विक होते. या उलट गाडगीळांनी अगदी आरंभापासूनच आजतागायत काही तात्विक वाङ्मयीन प्रश्नांवर लिहिले असले तरी त्यांच्या समीक्षेचा मुख्य भर लेखक व पुस्तके यांचा आस्वाद व विश्लेषण, या पुस्तकांनी दिलेला वैधानिक अनुभव यांच्यावरच राहिला. या समीक्षेत तात्विक विवेचन आले ते अनुषंगाने. सौंदर्यशास्त्र हा तर गाडगीळांच्या विरोधाचा व टवाळीचा विषय ! (गाडगीळांच्या अनेक धक्कादायक (खळबळजनक) विधानांपैकी निम्मी तरी सौंदर्यशास्त्रविषयी असतील !)*

*आणखी एक फरक असा की, गाडगीळांनी आपल्या समीक्षेसाठी व्याख्याने, चर्चासत्रे यासारखी खुली व्यासपीठेही सातत्याने वापरली. पुष्कळ वेळा, त्यांची या माध्यमातून केलेली सादरीकरणे हाच त्यांच्या समीक्षात्मक लेखनाचा आरंभबिंदू ठरला. या प्रक्रियेमुळेच गाडगीळांच्या समीक्षेच्या भाषेत अधिक सुगमपणा आहे. शिवाय ती भाषाच जात्याच सरळ, सोपी आहे, तिच्या ठिकाणी अवघड विचारही ढकलून सांगण्याचे कौशल्य आहे. या भाषेला सृजनशीलतेचा स्पर्श आहे. मर्ढेकरांच्या समीक्षा-सौंदर्यशास्त्राच्या भाषेत हे गुण जवळजवळ नाहीत. कदाचित त्यांच्याविषयी हाच या स्वरूपाच्या भाषेला अटकाव करणारा असेल. त्यामुळे गाडगीळांच्या समीक्षेला असलेला सृजनशील बाज मर्ढेकरांच्या समीक्षेत आढळत नाही. गाडगीळांमधला समीक्षक हा स्वतःमधल्या ललित लेखकाच्या सोबतीने वावरतो.*

विजया राजाध्यक्ष : दोन मुंग्यांचे महाभारत
'गंगाधर गाडगीळ : व्यक्ती आणि सृष्टी' पृष्ठ ५९६

'कलावादी' गाडगीळांनी साहित्यप्रकारांच्या अंगभूत श्रेणीविषयी चर्चा केलेली आहे. विनोदी साहित्य, ललितनिबंध-लघुकथा, आणि काव्य-कथनात्मक साहित्य या प्रकारांबद्दलच्या त्यांच्या मतांतील वैय्यर्थ्य मालशांनी अचूकपणे स्पष्ट केलेले आहे.

'साहित्याच्या वर्गीकरणाच्या तत्त्वांची जाण असणारी समीक्षा करणे म्हणजे रूपवाद सोडून देणे नव्हे' अशी एक समजूत मालशे घालताना दिसतात. समीक्षाव्यवहारातील ताण-तणाव कमी करण्याच्या दृष्टीने असा समजुतदारपणा नक्कीच स्तुत्य आहे. पण अशी तडजोड होणे शक्य आहे का? कारण 'वर्गीकरण, व्यवस्थितीकरण हा मानवाच्या अनुभव घेण्याच्या पद्धतीचा स्वाभाविक भाग असतो' हे त्यांचे मत मान्य केले तरी कलाकृती हा प्रतिभेचा स्वैर व पूर्णपणे मुक्त विलास असतो हे मतही लक्षात घ्यावे लागते. हा वादाचा मुद्दा म्हणून सोडून दिला तरी 'साहित्यकृतीला अनन्य मानणारी भूमिका हीच खरी रूपवादी भूमिका, असा आग्रह धरणे योग्य ठरणार नाही. खरे तर रूपवादी भूमिकेला अधिक धारदार बनविणारी समीक्षा गाडगीळांनी लिहिलेली आहे, असेच म्हणायला हवे. प्रकारनिष्ठ तत्त्वांच्या आणि निकषांच्या आधारेच त्यांनी नवटीकेच्या मानदंडांची मांडणी करावी, हे मराठी समीक्षेला त्यांचे योगदानच म्हणायला हवे' हे मालश्यांचे मत मात्र एक प्रश्न उभा करते. त्यांना वाटते तशी समंजस समन्वयाची भूमिका गाडगीळांची खरोखर आहे का? मग त्यांच्या समीक्षेत या भूमिकेला पुष्टी देणाऱ्या जागा का सापडत नाहीत?

सुधीर रसाळ यांनी गाडगीळांचा साहित्यविचार स्पष्ट केलेला आहे. त्यांच्या मते 'गंगाधर गाडगीळांचा साहित्यविचार हा केवळ साहित्यासंबंधीच्या चिंतनावर आधारित नाही; त्यामागे मानव आणि एकूण मानवी जीवन यांचे आकलन उभे आहे.' पण असे दिसते की त्यांचे आकलन केवलचिद्वादी सौंदर्योपासकांच्या आकलनाप्रमाणेच आहे. म्हणजे थोडक्यात, कांट आदींच्या चैतन्यवादी/कलावादी भूमिकेशी मिळतेजुळते असेच. मग साहजिकच विशिष्टत्व किंवा अनन्यसाधारणत्व, तर्कातीतता, नियमरहितता इ. साहित्याचे विशेष ठरतात. (थोड्या वेगळ्या भाषेत रसाळांनी हेच सांगितले आहे.)

गाडगीळांनी अनुभववाद मांडला आणि अनुभवांच्या संगतीबाबत दोन भूमिकांही मांडल्या हे रसाळांचे निरीक्षण योग्यच आहे. पहिली चैतन्यवादप्रणित सेंद्रीय संगती; तर दुसरी साधर्म्यविरोध वगैरेंवर आधारलेली संगती. म्हणजे दुसरीही कलावादीच, पण चैतन्यवादी नव्हे. पण 'या दोन भूमिकांचा मेळ त्यांच्या भूमिकेत घातला गेल्याचे आढळत नाही' असे रसाळांचेच म्हणणे आहे.

गाडगीळ साहित्यकृतीच्या अनन्यसाधारणत्वाला महत्त्व देतात, ती विशिष्ट प्रकारचे म्हणजे कलात्मक किंवा भावसत्य प्रकट करीत असते आणि प्रामुख्याने अनुभवातला खाजगीपणा काढून टाकला की ती वैश्विक बनते असे त्यांचे मत आहे. हा सारा भाग रसाळांनी व्यवस्थितपणे मांडला आहे.

साहित्याचे जीवनाशी अपरिहार्य नाते असून ते जीवनापासून दूर गेल्यास त्याची हानीच होईल असे गाडगीळ आग्रहपूर्वक मांडतात, पण त्याचबरोबर वास्तवाशी इमान राखणे हे

त्यांना साहित्याचे मूल्य वाटत नाही, साहित्याचे मूल्य फक्त कलामूल्यांनी ठरत असते असा गाडगीळ 'इशारा' देतात असे रसाळांनी म्हटले आहे. हे सर्व गोंधळात टाकणारे वाटते. कारण मुळात अर्ध्या चैतन्यवादी असणाऱ्या स्वायत्ततावाद्याने दुसऱ्या ध्रुवावरील जीवनानुबंधावर भर देणे, साहित्याचे जीवनाशी नाते आहे असे 'आग्रहा'ने म्हणणे, तरीही साहित्याचे 'साहित्यत्व' जीवनमूल्यांनी ठरत नसून फक्त कलामूल्यांनीच ठरते असा 'इशारा' देणे, त्यातही ही कलामूल्ये कोणती यांचा निर्देश न करणे हा सारा प्रकार अगम्य नसला तरी गोंधळात टाकणारा आहे. कारण साहित्यात जरी जीवन आले तरी त्या जीवनानुभवांची संगती तर्कादी जीवनमूल्यानुसार लावली जात नसून त्या संगतीचे नियम त्या त्या कलाकृतीपुरते तयार होऊन निर्मितीनंतर नाहीसे होत असतात, असे स्वायत्ततावादी सौंदर्यशास्त्र सांगते. तेव्हा गाडगीळांच्या भूमिकेची संगती कशी लावायची? असाच प्रकार अशुद्धत्वाच्या संकल्पनेचा. जिचे जीवनाशी अपरिहार्य नाते आहे, जी जीवनातून निर्माण होते, इतकेच नव्हे तर जी जीवनापासून दूर गेल्यास तिची स्वत:चीच हानी होते असे जिच्याबद्दल गाडगीळांचे मत आहे ती साहित्यकृती जीवनाच्या समावेशामुळे 'अशुद्ध' कशी होते? म्हणजे एका बाजूला म्हणायचे जीवनाशिवाय साहित्यसिद्धी अशक्य; आणि त्याचवेळी दुसऱ्या बाजूला म्हणायचे की जीवनाचा समावेश झाला की साहित्यसिद्धी अशुद्ध. शिवाय अशा लेखनाचे 'साहित्यत्व' निश्चित करण्यासाठी त्यांचा आग्रह फक्त कलामूल्यांचा. (म्हणजे आविष्कारवाद वा रूपवाद सांगतो तीच मूल्ये ना?). वर असेही म्हणणे की साहित्यात कलात्मक संघटनेबरोबरच कलाबाह्य (म्हणजे प्रामुख्याने जीवनाशी संबद्ध अशाच ना?) संघटना अस्तित्वात असतात. 'या त्यांच्या भूमिकेमुळे त्यांचा स्वायत्ततावाद हा अन्य स्वायत्ततावादी विचारांपेक्षा नवा व वेगळा ठरतो', या रसाळांच्या प्रशस्तीपत्रकातील 'नवा व वेगळा' याचा अर्थ 'दोन्ही डगरीवर हात ठेवणारा' असा घ्यायचा का? असाच प्रश्न 'गाडगीळ हे स्वायत्ततावादी असूनही लौकिकतावादी आहेत' या चमत्कारिक विधानाबद्दल उभा करता येईल. म्हणजे जो फक्त साहित्यगत अनुभवांची लौकिता मानतो, पण 'साहित्यत्वा'चा विचार करताना लौकिकाला मूल्यप्रतिष्ठा द्यायचे नाकारतो तो 'लौकिकतावादी'? गाडगीळांच्या कथेत आढळणाऱ्या स्त्रीचित्रणाप्रमाणेच समीक्षेतील जीवनाचे वा लौकिकाचे 'महत्त्व' आहे असे दिसते. दोन्हींना प्रतिष्ठा नाकारलेली; पण त्यांची आवश्यकता आग्रहाने प्रतिपादलेली !

स्वत: रसाळांनीही गाडगीळांच्या समीक्षेतील काही कच्चे दुवे स्पष्ट केलेले आहेतच. खरे तर समीक्षक गाडगीळांची नेमकी जातकुळी त्यांनी हेरलेली आहे. 'त्यांचे (गाडगीळांचे) लेखन हे प्रामुख्याने खंडनमंडनपर आहे' असे रसाळांनी म्हटले आहे. हे विधानच गाडगीळांच्या समीक्षा-लेखनाची प्रकृती दाखविणारे आहे. त्यांच्या समीक्षेची जात बव्हंशी प्रतिक्रियात्मक स्वरूपाची आहे. नवसाहित्यावरील प्रतिकूल टीकेला उत्तर देणे आणि नवसाहित्याचे 'साहित्यत्व' सिद्ध करणे यासाठी त्यांच्यातला समीक्षक जन्माला आलेला आहे. त्यामुळे एका अभिनिवेशाचा सतत संचार त्यांच्या समीक्षालेखनात जाणवतो. 'नाविन्यपूर्ण, आग्रही व आवेशयुक्त' ही भारती निरगुडकर यांनी 'खडक आणि पाणी'मधील समीक्षेबद्दल योजिलेली विशेषणे अचूक म्हणावी अशीच आहेत. 'सौंदर्यशास्त्र : एक भाकड खटाटोप' किंवा 'रसचर्चा : एक अडगळ'

अशी समीक्षालेखांची शीर्षके याचीच साक्ष देतात. अशा तऱ्हेच्या अभिनिवेशाचा भर असल्यामुळे व्यंकटेश माडगूळकर हे जी. ए. कुलकर्णी यांच्यापेक्षा श्रेष्ठ कथाकार असे त्यांच्या लेखावरून ध्वनित व्हायला लागते. दि. के. बेडेकर, रा. श्री. जोग, वा. ल. कुलकर्णी, रा. भा. पाटणकर वगैरेंचा समाचार घेताना अशीच एक खुमखुमी जाणवत राहते. वाटते, सैद्धांतिक भूमिकेला पक्के असणारे मर्ढेकर लवकर गेले म्हणून सुटले. आणखी जगले असते आणि कुठे काही थोडा बेबनाव आला असता तर त्यांचीही काही खैर नसती ! (मग विजयाबाईंसारख्यांची मात्र मोठीच अडचण झाली असती!!)

यामुळेच सैद्धांतिक समीक्षामूल्यांबद्दलची एक अनास्था त्यांच्या समीक्षालेखनात दिसून येत असावी. मिलिंद मालशे किंवा सुधीर रसाळ यांच्यावर गाडगीळांना सांभाळून घेण्याची पाळी का यावी? मौज अशी की, गाडगीळांचा जीवनवादाला विरोध आहे. पण त्यांनी वेगवेगळ्या साहित्यकृतींची जी रसग्रहणे केली आहेत, त्यात जीवनवाद डोकावत नाही का?

सुधीर रसाळांनी हे सारे जाणलेले आहे. म्हणूनच ते त्यांच्या लेखाच्या अखेरीस लिहितात, '.... त्यांच्या भूमिकेतील संदिग्ध जागा त्यांच्या भूमिकेतील कच्चेपणापेक्षा त्यांच्या लेखनाच्या स्फुट, नैमित्तिक स्वरूपामुळे निर्माण झालेल्या आहेत. साहित्यासंबंधी सैद्धांतिक मांडणी करण्याच्या उद्दिष्टातून जर त्यांचे लेखन झाले असते तर या लेखनातील संदिग्ध जागा पूर्णतः स्पष्ट झाल्या असत्या, एवढी सैद्धांतिक मांडणीची ताकद गंगाधर गाडगीळांमध्ये असल्याचे त्यांच्या समीक्षालेखनातूनच प्रत्ययाला येते.' यावर 'ठीक आहे' इतकेच आपण म्हणू शकतो ! कारण गाडगीळांच्या भूमिकेत संदिग्ध जागा आहेत हे रसाळांना मान्य आहे. 'पेक्षा' ही संज्ञा त्यांना गाडगीळांच्या भूमिकेतील कच्चेपणाही मान्य असल्याचेच सूचित करते. तसेच साहित्यासंबंधीची सैद्धान्तिक मांडणी करण्याचे त्यांच्या समीक्षालेखनाचे उद्दिष्ट नव्हते हेही त्यांनी सुचविले आहे आणि हे सारे जर नसते तर गाडगीळांच्या सैद्धान्तिक मांडणीची ताकद दिसली असती असे म्हणणे रसाळांच्या सौजन्याला शोभादायक असले तरी गाडगीळांचे काय? की त्यांनाही हे प्रसन्नपणे हसून होकारार्थी मान हलविण्यायोग्य वाटते?

सैद्धान्तिक समीक्षेबाबत मतभिन्नता असेल पण वेगवेगळ्या साहित्यकृतींबाबत गाडगीळांनी केलेली उपयोजित समीक्षा मोठी उल्लेखनीय आहे. डावा म्हणावा असा त्यात एकही लेख दिसत नाही. सिद्धान्ताबद्दलचा अनाग्रह हेही त्याचे एक कारण म्हणता येईल.

गंगाधर गाडगीळ निर्मित (साहित्य) सृष्टीबाबत प्रस्तुत ग्रंथात आलेल्या लेखनाचा परिचयात्मक आढावा इथे संपतो आहे. आवश्यक असूनही यातील काही लेखाबद्दल विस्ताराने लिहिणे अशक्य होते. गाडगीळांचे मराठी साहित्यातील स्थान किती महत्त्वाचे आहे हे प्रस्तुत ग्रंथ स्पष्ट करतो इतके म्हटले तरी पुरे.

या ग्रंथातील दुसरा भाग गाडगीळांसंबंधी अनेकांनी केलेल्या व्यक्तिगत लिखाणाचा आहे. त्याचे परीक्षण शक्य नाही. पण यातून गाडगीळांची एक खास चतुर आणि चतुरस्त्र अशी 'चित्तपावनी' मूर्ती साकारत जाते. मध्यमवर्गीय मराठी माणसाच्या दृष्टीने प्राप्य आणि दुःष्प्राप्य अशा कुटुंब आणि कुटुंबाबाहेरचे जग यातील भूमिका त्यांनी अत्यंत यशस्वीपणे पार पाडल्या

आहेत. अंगभूत गुण व कृतिशीलता यांची जोड देऊन लौकिक जीवनात गाडगीळांइतका यशस्वी झालेला दुसरा मराठी लेखक सापडणे शक्य वाटत नाही. मुख्य म्हणजे साहित्य व प्रत्यक्ष जीवन यातील शिखरे हासिल करूनही गाडगीळ थांबलेले नाहीत. एरव्ही 'अंतर्नाद' मासिकाच्या जून १९९७ च्या अंकात 'हिंदू आध्यात्मिक परंपरा आणि मी' हा लेख लिहून त्यांनी खळबळ उडवून दिली नसती. गाडगीळांनी असा लेख लिहायला नेमकी हीच वेळ का निवडावी हा प्रश्न मनाशी धरून प्रा. सुधीर यार्दी यांनी एप्रिल ९८ च्या 'अंतर्नाद'मध्ये एक सविस्तर पत्र लिहिले आहे. त्यात त्यांनी १९९७ सालाला असलेल्या हिंदुत्ववादाच्या प्रभावाच्या ऐतिहासिक-राजकीय संदर्भाचे विश्लेषण केलेले आहे. महाराष्ट्रात युतीचे राज्यही स्थिरावल्याचा हाच काळ. गाडगीळांनी यार्दींना उत्तर दिलेले आहेच. त्यात आपल्याला पडायचे काही कारण नाही. आपण इतकेच लक्षात घ्यायचे की गाडगीळ अजून निवलेले नाहीत. नवे मनसुबे, नव्या हालचाली चालू आहेत. कारण पंच्याहत्तरी आली म्हणून जुनेनवे मनसुबे दप्तरी दाखल करणे हा गंगाधर गाडगीळांचा पिंड नव्हे !

□

अरविंद वामन कुळकर्णी
१४ स्वयंसिद्धा सोसायटी, पौड रस्ता, पुणे ३८.

□

(गंगाधर गाडगीळ : व्यक्ती आणि सृष्टी — संपादक प्रभा गणोरकर,
पॉप्युलर प्रकाशन प्रा. लि., मुंबई ३४.)

---

## स्वागत

- □ **मराठी संतचरित्रात्मक कादंबरी : एक मानदंड :** श्याम घोणसे, इंद्रायणी साहित्य, पुणे. पृष्ठे ११९
- □ **स्पंदनांची किमया :** उषादेवी विजय कोल्हटकर, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे. पृष्ठे १२०,
- □ **महामाता :** गो. श्री. बनहट्टी, मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई, पृष्ठे ५९
- □ **हृदयस्पर्शी :** सौ. सुमित्रा व श्री. वसंत आपटे, शुभदा प्रकाशन, पुणे. पृष्ठे १८७
- □ **स्वप्नपंख :** राजेंद्र मोलसे, देशमुख आणि कं., पुणे. पृष्ठे ४८०
- □ **फट् म्हणता ब्रह्महत्त्या :** श्रीराम अत्तरदे, रंगनाथ कुलकर्णी, मुंबई. पृष्ठे ५५
- □ **सहा कथाकार :** संपा.भालचंद्र फडके, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे. पृष्ठे २९९
- □ **सहा भाषणे :** वि. स. खांडेकर, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे, पृष्ठे १२२
- □ **चांदण्यात :** वि. स. खांडेकर, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे, पृष्ठे ८७
- □ **दवबिंदू :** वि. स. खांडेकर, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे, पृष्ठे १०३
- □ **मुक्तिवेध :** भास्करराव जाधव, देशमुख आणि कं., औरंगाबाद. पृष्ठे १२४
- □ **काळाची चाहुल :** चंद्रशेखर धर्माधिकारी, श. द. तुळपुळे, पुणे. पृष्ठे ४१६

# कवीच्या गावा जावे (कवी ना. घ. देशपांडे यांच्या गावी)

डॉ. मंदा खांडगे

माझ्या आधीच्या आणि आमच्याही पिढीला भुरळ घालणाऱ्या 'रानावनात गेली बाई शीळ' किंवा 'नदी किनारी नदी किनारी ग ' अशी अनेक मोहक गीतं लिहिणाऱ्या कविवर्यांच्या गावाला जायचं असं अनेक दिवस मनात घोळत होते. गेली दोन-तीन वर्षं म्हणाना ! पण योग जुळून येत नव्हता. कविवर्य ना. घ. देशपांडे दूर वऱ्हाड प्रांतात मेहेकर या गावी त्यांचं वास्तव्य. मेहेकर बुलढाणा जिल्ह्यातलं तालुक्याचं गाव. पुण्यापासून चार-साडेचारशे किलोमीटर. पूर्णा तीरावरच्या मेहेकरासारख्या लहानशा गावात राहून नाघंनी आपल्या सौदर्यवेधी आणि प्रतिभाशाली कवित्वाने मराठी सारस्वताचं दालन समृद्ध केलंय. आठ वर्षांपूर्वी नाघंना 'गदिमा' पुरस्कार मिळाला, तेव्हा पुरस्कार स्वीकारण्यासाठी ते पुण्याला येणार म्हणून त्यांचे चाहते उत्सुकतेने आणि अधिरतेने त्यांची वाट पाहात होते. पण गेल्या वीस-पंचवीस वर्षांत मेहेकर सोडून अगदी क्वचित दुसरीकडे जाणाऱ्या कविवर्यांनी निराशा केली. त्यामुळे कविवर्यांच्या भेटीचं औत्सुक्य तसंच राहिलं. कवींच्या गावाच्या भेटीच्या निमित्ताने काव्यवाचनाचा, काव्याचा अभ्यास सुरू केला. ना. घ. देशपांडे-नागोजीराव घन:श्याम देशपांडे हे व्यवसायाने वकील. पण पिंड काव्यलेखनाचा. मेहेकरसारख्या आडगावात त्यांना वकील म्हणून ओळखलं जातं. पुण्या-मुंबईकडे मात्र त्यांच्या कवित्वाचाच बोलबाला अधिक.



**कवी ना. घ. देशपांडे आणि डॉ. मंदा खांडगे**

*कवी : नागोजीराव घन:श्याम देशपांडे*
*जन्म :* २१ ऑगस्ट १९०९, सेंदूरजन (आजोळ, आजोळचे आडनाव देशमुख, मूळ आडनाव नवले)
*मूळ गाव :* साखरखेडी) जि. बुलढाणा, मूळ आडनाव तांबे.
*शिक्षण :* प्राथमिक शिक्षण व माध्यमिक शिक्षण सेंदूरजन, महेकर,.खामगाव, नागपूर.
बी. ए. - १९३१, एल्‌एल्‌ बी. - १९३३ (मॉरिस कॉलेज, नागपूर)
सुप्रसिद्ध 'शीळ' कविता - १९२९ (नागपूर येथे लिहिली)
एच्‌. एम्‌. व्ही. कंपनीची ह्या कवितेची रेकॉर्ड - १९३३ (गायक जी. एन. जोशी)
विवाह : १५ मे १९३५ - भुसावळचे वकील बापूसाहेब एकबोटे यांची कन्या शांता.
१ जानेवारी १९३५ - मेहेकर येथे वकिलीस प्रारंभ. १९७३ ते ८४ - घरी वकिली.
**पुरस्कार :**
१९६० - प्रजासत्ताक दिनाच्या काव्यसंमेलनासाठी महाराष्ट्रातर्फे भाग घेण्यास निमंत्रण.
१९६४ अभिसार या काव्यसंग्रहाला राज्यपुरस्कार.
महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ मानपत्र.
खूणगाठ या काव्यसंग्रहास साहित्य अकादमी पुरस्कार.
१९८४ - मेहेकर येथे संमेलन (अध्यक्ष पु. ल. देशपांडे) पंच्याहत्तरीनिमित्त ब्राह्मण युवक मंडळातर्फे सत्कार.
महाराष्ट्र गौरव पुरस्कार : अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलन, परभणी.
विदर्भ साहित्य संघ - 'साहित्य वाचस्पती' पुरस्कार (१९९६).
सन्मित्र सभा 'मेहेकर' मानपत्र.
**कवितासंग्रह :**
१) शीळ - १९५८, २) अभिसार - १९६८, ३) खूणगाठ - १९८५, ४) कंचनीचा महाल - १९९६ , ५) गुंफण - (निवडक कविता संग्रह) , ६) फुले आणि काटे - १९९७ - मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे.

नाघंच्या कविता अभ्यासताना लक्षात आलं की उत्कंठा, बेभानपणा, अधिरता या प्रेमिकांच्या मनातल्या ऊर्मींनी 'शीळ' या त्यांच्या कवितासंग्रहामधील त्यांच्या कविता परिपूर्ण आहेत. 'शीळ'मधील, बहुतेक प्रेमगीतांची जात रोखठोक, निर्भिड, दिलदार, मोकळ्या प्रीतीची आहे. सुमारे सहा दशकांपूर्वी सुरुवातीला त्यांची कविता 'ज्योत्स्ना', 'अभिरुची'मधून प्रसिद्ध होऊ लागली. 'नदीकिनारी' ही कविता ३०-३५ सालच्या सुमारास पहिल्यांदा 'ज्योत्स्ना' मासिकात प्रसिद्ध झाली.

*'वहात होते पिसाट वारे*
*तशात मी उडवले फवारे*
*उदून दिसली तुझ्या उराची नवी थरारी गड'*











किंवा

*'माझी तुझी चोरटी जेव्हा मिळाली*
*मिठी*
*झाले जगाचे कडे माझ्या तुझ्या एवढे'*

या मोकळ्या स्वच्छ ओळी वाचताना वाचक अवाक् झाला. कारण सौंदर्यवेधी मनाच्या प्रतिभेचे हे प्रस्फुरित झालेले अविष्करण.

*'तिथं रायाचे पिकले मळे*
*वर आकाश शोभे निळे*
*शरदाच्या ढगांची त्याला झील'*

असे पारदर्शी होते. नाघंची 'शीळ'मधील कविता नादमयी खचित. त्या नादात तल्लीन होण्याचं सामर्थ्य 'नदीकिनारी'तं होतं.

*'घेतला सखूचा मुका*
*(हं कुणास सांगू नका)*
*हलताच जराशी मका उडाली*
*वाऱ्यावर बावरी*
*गरगरा फिरे भिंगरी'*

'नदीकिनारी' किंवा 'गरगरा फिरे भिंगरी'मधील असं कवित्व काव्यप्रांतात थोडी खळबळ माजवून गेलं. मराठीतल्या गीतात मोकळे श्वास उमटू लागल्याच्या ह्या खुणा होत्या. ही त्यावेळच्या काव्यप्रांतातली जरा धिटाईच होती. सुसंस्कृत मनाला अशी कविता पेलायला थोडासा वेळच लागला. कवी अनिल, बा. भ. बोरकर या कवींमुळे सौंदर्यलक्ष्मी गीतांची भर मराठी कवितेत पडत होती. त्यातच ही नाघंची कविता आपल्या वेगळ्या ठसठशीत वाणाने आपलं असं वेगळेपण जपू लागली.

*'जरा निळ्या अन् जरा काजळी ढगात होती*
*सांज पांगली*
*ढवळी ढवळी वर बगळ्यांची संथ भरारी गऽ'*

अशा निसर्गवर्णनांनी ती अंगभूत सौंदर्याने नटलेली असल्याने रसिकांना मंत्रमुग्ध करत होती. निसर्गाची अशी सुंदर पारदर्शी शब्दचित्रं ज्या परिसरातून त्यांच्या काव्यात झरत आली तो निसर्ग, त्यांचं मेहेकर गाव, त्यांच्या आजोळचं गाव सेंदूरजन भोवतालचा परिसर पाहण्याचा योग जुळून आला. आणि औरंगाबादमार्गे मेहेकरला जाण्याचा बेत निश्चित झाला. ना. घ. देशपांडे आता जवळजवळ नव्वदीच्या घरात आलेले. त्यांच्याकडे पत्रातनं भेटीचा दिवस कळवला. प्रवासाला निघाले ते दिवस तसे थंडीचे. पण ही थंडी या इकडच्या विदर्भातल्या प्रवासासाठी छान होती. औरंगाबादहून जालना फाट्याने मेहेकरकडे जाताना वाटेत देऊळगावराजा, सिंदखेडराजा, सुलतानपुरा, लोणार, मेहेकर असा हा प्रवास करायचा होता. बराच दूरवरचा प्रवास झाल्याने लोणारमध्ये थोडी चौकशी करून तसेच लोणार सरोवराकडे

कसे जाता येईल याची चौकशी करून विश्रामधाम गाठले. दुसऱ्या दिवशी अगदी सकाळीच लोणार सरोवराकडे निघालो. बरोबर मैत्रिणी असल्याने प्रवास सुखकर होता. हवेतला गारवा मनाची ताजगी वाढवणारा. त्यामुळे साडेचारशे फूट खाली उतरून लोणार सरोवर पहायलाही मी उत्सुक झाले. कविवर्य ना. घ. देशपांडे यांच्या मेहेकरच्या आसपासचा हा परिसर. या साऱ्या परिसराची नादचित्रे त्यांच्या काव्यातून उमटलेली. सत्ययुगात लोणार सरोवर बैरजतीर्थ या नावाने ओळखलं जातं. लोणार सरोवर आणि मेहेकर यांचे उल्लेख पुराणातही आहेत. मेहेकर गावाविषयी काही आख्यायिका प्रचलित आहेत. प्राचीन कुंतल देशात हा प्रदेश समाविष्ट होतो. या परिसरात मध्ययुगीत मंदिराचे अवशेषही सापडतात. काही ऐतिहासिक निर्देशानुसार हा प्रदेश सम्राट अशोकाच्या साम्राज्याचा होता. त्यानंतर या प्रदेशावर सातवाहनांचे राज्य आले. लोणारचा उल्लेख पद्मपुराण, स्कंदपुराण, रुक्मिणी स्वयंवर, लीळा चरित्रामधून आढळतो. हा दंडकारण्याचा भाग मानला जातो. वाल्मिकी रामायणात पंचापप्सर सरोवर म्हणून उल्लेखलेले सरोवर हेच लोणार असे प्रतिपादन संस्कृत साहित्याचे ज्येष्ठ अभ्यासक डॉ. श्री. वा. सोहोनी यांनी केले आहे. तेव्हा असे पौराणिक संदर्भ असलेले मेहेकर व लोणार. सरोवरकाठचा परिसरच सुमारे सहा-साडेसहा किलोमीटर. संपूर्ण प्रदक्षिणा या सरोवराभोवती होते. खारट पाण्याचे हे सरोवर. सगळीकडे खारटपणाचा उग्र दर्प. पण वरून पाहिलं तर हा जलाशय आणि परिसर अतिशय रम्य दिसतो. पांढरा रंग दिलेलं कमलजा देवीचं मंदिर वरून एखाद्या ठिपक्याएवढं दिसत होतं. उतारावरून खाली उतरल्यावरची दाट झाडी मधल्या काळात जंगलतोड झाल्याने कमी झालीय, पण अजूनही इथे तऱ्हेतऱ्हेचे पक्षी स्थलांतर करीत येतात. दाट बनात मोर टाहो फोडतात आणि या झाडावरून त्या झाडावर माकडं मनसोक्त विहार करत असतात. सकाळी सकाळीच इथल्या या निसर्गरम्य परिसरात दोन-तीन मोर पाहिले आणि मन वेडावून गेलं. शहरगावात असं दृश्य फारसं न दिसणारं. थोडी चाहूल लागल्यावर ते मोर दाट झाडीत नाहीसेही झाले. झाडावर माकडं मात्र शेंड्यापर्यंत तुरुतुरू धावत होती. सकाळी सकाळी पक्ष्यांचा किलबिलाट शांत वातावरणात तेवढाच काय तो कानावर पडत होता. ५०-६० हजार वर्षांपूर्वीच्या उल्काघाताने जो खड्डा झाला, कालांतराने त्यात पाणी साठत गेले आणि त्याचे रूपांतर सरोवरात झाले. आजूबाजूच्या परिसरातील जमिनीत असणारे क्षार पावसाच्या पाण्याबरोबर वाहत जाऊन या विवरात जमा होत राहिले. हजारो वर्षांत या क्षाराचे प्रमाण वाढल्याने हे गोड्या पाण्याचे तळे न राहता अति खाऱ्या पाण्याचे सरोवर बनले. लोणार विवराच्या काठाशी धारा मंदिरसमूह आहे. धो धो पडणारी ही संततधार म्हणजे लोणारची गंगाच म्हणायची. ह्या पाण्याच्या उगमाचा शोध अजूनही लागलेला नाही. धारामंदिर समूहाकडून खाली उतरून दाट झाडीतली उध्वस्त वास्तू म्हणजे शुक्राचार्यांची पाठशाला होती असे म्हणतात. या उद्ध्वस्त वास्तूचं कोरीवकाम प्रेक्षणीय, पूर्वीची ही त्यांची वेधशाळाही होती म्हणतात. भस्मटेकडी, सीतान्हाणी, पापदरेश्वर मंदिर, रामगयामंदिर, कुमारेश्वर, वाघ महादेव मंदिर हे सारं पहात लागलं श्री कमलजादेवीचं मंदिर. पांढऱ्या शुभ्र रंगाने रंगवलेलं. समोरच सरोवरात विहीर दिसते. या देवीचं मंदिर पहाण्याची उत्सुकता होती म्हणून तर एवढं अंतर

चालत इथपर्यंत येऊन ठेपलो. परिसर स्वच्छ, शांत. घटकाभर थांबून विश्रांती घेतली. ज्या झाडाखाली विसावा घ्यायला बसलो त्यावर पोपटांचा थवा येऊन उतरला होता. समोर सरोवरात ब्राह्मणी बदकं पोहत होती. दृश्य मोठं विलोभनीय होतं. या परिसरात सुमारे ७५ प्रकारचे पक्षी तरी येतात म्हणे. देवीचं दर्शन घेतलं. 'कंचनीचा महाल' या नाघंच्या दीर्घकवितेतली कंचनी मेहेकरमधून या देवीचं दर्शन घेणार होती म्हणे. मेहेकरच्या उत्तरेला पैनगंगेच्या काठी अर्धगोल टेकडीच्या भागात एक जुनी वास्तू आहे, तिला 'कंचनीचा महाल' म्हणतात. वास्तूच्या पश्चिमेला पैनगंगा नदी आहे. ही फार जुनाट वास्तू आहे. ह्या वास्तूविषयी एक दंतकथा मेहेकरमध्ये सांगितली जाते. या दंतकथेनुसार या महालात एक कंचनी रहात होती. तिला लोणारमधल्या या कमलजा देवीच्या मंदिरातला दिवा तिच्या महालातून पहायचा होता.

*'त्यासाठी महालावर या बांधीत मजले ही वर कंचनी गेली*
*तहान-भुकेची मायेची प्रीतीची नव्हती कदर केली*
*मुळात होते हे दोनच मजले : आणखी बांधले पाच,*
*अनेक ज्योतींच्या भोवती झुलले झुंबरामधले काच,*
*वाटले होते की, उंचात जाऊन ताऱ्यांत करीन वेचा;*
*वाटले होते की, तेथून पाहीन दीपक कमलजेचा.*
*त्यासाठी*
*चढले मजले सहाहि पण तो दीपक दिसला नाही.*
*चढले सातवा आणि पाहिले दक्षिण दिशेस बाई !*
*तोच तो इच्छित दीपक दिसला'*

कंचनीला तिच्या महालातून जो दिवा पहायचा होता तो दिसला. मात्र दिवा पाहिल्याबरोबर ती शिळा होऊन महालासमोर पडली. 'कंचनीचा महाल' या कवितेत स्वत: ती कंचनीच आपली ही कर्मकहाणी कथन करतेय. एका पथिकाला. कमलजेचा दिवा पाहिला आणि

*'काठाशी हासत आले*
*क्षितिजापासून क्षितिजापर्यंत आकाश कंपित झाले*
*त्यातलं काठिण्य तनूत आले रे, तोच अन् झाले मी काळी*
*कठीणपणा हा गोठून पडले दगड बनून खाली'*

नाघंची अक्षरछंदातली ही दीर्घकविता अशी मनावर गारुड घालणारी.

*'दोनच उरले मजले खालचे कुणीच नाही रे गडी !*
*एकही कवाड नाही रे, आणखी एकही नाही रे कडी !*
*घुमतो पारवा, झोंबतो गारवा, वाऱ्यात वाजते शिटी'*

अशा भग्नावस्थेतली 'कंचनीचा महाल' ही वास्तू आणि हे सरोवराकाठचं कमलजा देवीचं मंदिर. मेहेकरमध्ये गेल्यावर ही भग्न वास्तू पाहण्याची ओढही होतीच. कारण ना. घं.च्या दीर्घ कवितेतला हा सारा परिसर कविता वाचताना साकार झाला होता तो प्रत्यक्ष पहायची संधी मिळत होती. अतिशय सुदर असं हे काव्य मुळातून संपूर्णपणे वाचायला हवं.

म्हणजे त्यातलं गूढतेचं वलय कसं आपल्याला भारून टाकतं, त्याचा प्रत्यय येईल. 'कमलजा देवी आणि कंचनीचा महाल या काव्याच्या बरोबरच आठवलं नाघंनी 'फुले आणि काटे'मध्ये एक आठवण लिहिलीय. पु. भा. भावे एकदा त्यांच्याकडे आले असता नाघ त्यांना घेऊन लोणारला गेले. कुमारेश्वरापासून खाली उतरून कमलजा देवीचं दर्शन घेऊन उत्तर काठावर आल्यावर झाडांच्या राईत बसून भाव्यांनी नाघंच्या कवितांचं बाड वाचलं. केवळ ध्वनी आणि अत्यंत सूचक प्रतिमा ह्यांच्या सहाय्याने सूक्ष्मतरल परंतु मनाला चटका लावणाऱ्या भाववृत्ती निर्माण करणाऱ्या नाघंच्या कविता वाचायला किती सुंदर परिसर निवडला होता पु. भा. भावे यांनी ! हा परिसर मनाला मोहवणारा शांत, पण उन्हं माथ्यावर यायच्या आधी परत तेवढंच अंतर चालून परत वर चढून जायचं होतं आणि आता मेहेकरला नाघंच्या गावाला जाण्याचे वेधही लागले होते. चढण चढून वर येईपर्यंत ऊन जाणवू लागलं होतं. पण हवेतल्या गारव्याने ते तितकसं तापदायक वाटत नव्हतंही. वरच्या परिसरातून परत एकदा सरोवराचं ते विलोभनीय दृश्य टिपताना जाणवलं केवढा मोठा परिसर या तळ्याने व्यापलाय ! अथांग जलाशय आणि हिरवी दाट झाडी.

रविवार असल्याने लोणारमध्ये आठवड्याच्या बाजाराचा वार होता. त्यामुळे गावात गर्दी होती. बाजार हिंडून जवळच असलेल्या मारुतीच्या मंदिरात गेलो. कारण इतके दूर आलात तर इथलं प्रसिद्ध असं मारुतीचं आणि दैत्य सूदनाचं मंदिर पाहिल्याशिवाय जाऊ नका असं ग्रामस्थांनी सांगितलं. झोपलेल्या मारुतीचं मंदिर पाहून थोडा अचंबा वाटला. कारण असा मारुती फारच दुर्मिळ. या मूर्तीमध्ये 'मॅग्नेटिक पॉवर' आहे. लंकादहनानंतर थकलेला मारुती येथे येऊन झोपला म्हणतात !

विदर्भातल्या प्रेक्षणीय मंदिरात दैत्यसूदनाचं मंदिर गणलं जातं. लोणारसारख्या आडगावातल्या शिल्पकलेचा उत्तम नमुना असलेल्या या मंदिरात अतिशय सुंदर नक्षीकाम असून दैत्यसूदनाची मूर्ती देखणी आहे. मंदिराच्या छताच्या चारही कोपऱ्यात अप्रतिम शिल्पं कोरलेली आहेत. बाह्य भागावर तर असंख्य मूर्ती कोरलेल्या आहेत. मेहेकरला जायला उशीर होईल म्हणून हे मंदिर पाहायचं आम्ही टाळत होतो पण मंदिर पाहिलं आणि डोळ्यांचं पारणं फिटलं. कृष्णदेवरायाच्या काळातलं हे मंदिर हेमाडपंती शिल्पाचा अप्रतिम नमुना आहे. लोणारमधून आता मेहकरकडे जायचं होतं. बरोबर राजू गाईड होता. त्याने कितीतरी माहिती पुरवली होती. जैन, मुसलमान, हिंदू, बौद्ध अशी संमिश्र वस्ती असलेलं हे गाव गल्ली-बोळांमधून विस्तारलेलं आहे. इथलं वैशिष्ट्य असं की मुसलमान लोकही सार्वजनिक गणपती बसवतात. अर्थव्यवस्थेत शेती हाच मुख्य व्यवसाय मेहेकर-लोणार येथील असावा. गहू, हरवरा, करडई या पिकाखेरीज कापूस हे महत्त्वाचं पीक असल्याने त्यावर आधारित इथले उद्योग.

मेहेकर लोणारहून अवघं पाऊण तासाच्या अंतरावर. 'खुणा गावच्या दिसू लागल्या' अवघ्या २० व्या वर्षी 'शीळ' सारखी कविता लिहिणारे नाघ गेली ६०-६५ वर्षं अगदी निष्ठापूर्वक कविताच लिहित राहिले. 'शीळ' घराघरात नेऊन पोहोचवली जी. एन्. जोशींनी.

**डॉ. मंदा खांडगे**

**शिक्षण :** एम्. ए., पीएच्. डी. (१९७९) अर्वाचीन मराठी कवयित्रींच्या काव्याचा चिकित्सक अभ्यास - प्रबंधलेखन.

केसरी, सकाळ, तरुणभारतमधून लेखमाला. काही काळ आनंद व पिसारा दिवाळी अंक संपादन सहकार्य.

**साहित्यिक कार्य आणि पुरस्कार :**

१) साहित्यप्रेमी भगिनी मंडळ या संस्थेच्या अध्यक्षा. २) पेशवेकालीन वास्तू याविषयी महाराष्ट्रभर व्याख्याने. ३) पेशवेकालीन वाड्यांच्या संशोधनपर कामासाठी पुणे कॉर्पोरेशनकडून पुरस्कार देऊन गौरव (१९९२). ४) पेशवेकालीन वाड्यांच्या संशोधनपर लेखनासाठी डी. आर. नगरकर अॅडव्होकेट फाऊंडेशन पुरस्कार (१९९८).

**लेखन-पुस्तके :**

१) वैभव पेशवेकालीन वाड्यांचे -१९९२, २) महिला संचालित संस्था दर्शन - १९८६, ३) मी गुंड्याभाऊ (विष्णुपंत जोग-आत्मकथन - शब्दांकन) १९९४, ४) पाउलखुणा रूपेरी दुनियेच्या-१९९४, ५) गस्तवाल्याची गीते (संपादन)-१९९६ ६) स्मरण बालकवींच्या शब्दधनाचे (संपादित) प्रकाशनाच्या मार्गावर.

**कुमारांसाठी**

१) जंगलातलं गुपित - कादंबरी, २) खेळ्यांच्या राज्यात - कादंबरी , ३) केशवसुत-चरित्र, ४) जोतिर्मयी (सावित्रीबाई फुले)-चरित्र.

**कथासंग्रह (कुमारांसाठी)**

१) माकडवाला जगू, २) पक्षी मित्र (आ. ४ थी), ३) दूरदेशीच्या बालकथा (भाग ३) , ४) दूरदेशीच्या बालकथा (भाग ४) , ५) मित्रप्रेम, ६) वृक्षमित्र, ७) दोडी (प्रकाशनाच्या मार्गावर), ८) मामाचा वाडा चिरेबंदी.

**कवींच्या गावा जावे - लेखमाला महाराष्ट्र साहित्य पत्रिका**

१) बालकवींच्या गावी - एप्रिल-जून ९३.
२) पद्माताईंच्या गावी - जुलै-सप्टेंबर ९३.
३) ग. ह. पाटील यांच्या गावी-ऑक्टोबर-डिसेंबर ९३.
४) केशवसुतांच्या गावी - जानेवारी-मार्च ९४.
५) बहिणाबाईंच्या गावी - जानेवारी-मार्च ९५.
६) बा. भ. बोरकरांच्या गावी - एप्रिल-जून ९७.
७) कवी माधवांच्या गावी - जुलै-सप्टेंबर ९७.
८) ना. घ. देशपांडे यांच्या गावी - जुलै-सप्टेंबर ९८.

आणि मग नाघंच्या कितीतरी नादमयी कविता वाऱ्यावर सांगावा घेऊन यावा तशा ध्वनिमुद्रिकेच्या लहरींमधून घराघरातून नादावत राहिल्या. पुढे गजानन वाटवेंनी त्यांच्या कवितांना सुंदर चाली



अनुक्रमणिका

दिल्या. एव्हाना कविवर्य रसिकमान्य झाले होते. एवढंच नाही तर मराठी 'समीक्षकां'च्या प्रेमालाही पात्र ठरले होते. अशा कविवर्यांची भेट होणार म्हणून उत्सुकता तर होतीच पण कित्येक दिवस घोकत असलेलं मेहेकरचं दर्शन टप्प्यात होतं. सेंदूरजन हे नाघंचं आजोळगाव आणि 'इतिहासप्रसिद्ध खेडी' याला साखरखेडीही म्हणतात. हे त्यांचं वतनगाव. ही दोन्ही गावं मेहेकरापासून जवळ आहेत. बोलबोल म्हणेपर्यंत मेहेकर आलंही. गावात शिरताना गावातलं शारंगधराचं मंदिर पाहून मग नाघंच्या घरी गेलो. मंदिरापासून नाघंचं घर मंदिराच्या मागच्या बाजूनी अगदी पायी चालत जाण्यासारखं आहे, अशी माहिती मिळाली. मुळात गावात शिरल्या शिरल्या नुसतं ना. घ. देशपांडे यांच्या घरी जायचंय म्हटल्यावर नाक्यावरच्या आम्ही विचारलेल्या माणसाने नाघंच्या घराचा पत्ता सांगितलाही. गावामध्ये नाघ किती प्रसिद्ध आहेत, याचा प्रत्यय आला. मुख्य रस्त्यावरून मिळालेल्या माहितीनुसार आम्ही बाजारपेठेतला रस्ता ओलांडून बालाजीच्या मंदिराकडे निघालो. आजूबाजूला मुसलमान वस्ती जास्त. हे मंदिर शारंगधराचं मंदिर म्हणून प्रसिद्ध आहे. ३०-३५ हजार वस्ती असलेल्या या गावातलं हे प्रसिद्ध असं मंदिर. मत्स्यपुराणात मेहेकरचा उल्लेख 'मेघंकर' असा येतो. मेघंकर राक्षसाचा वध विष्णूने — बालाजीने केला म्हणून मेहेकरमधल्या बालाजीला शारंगधर म्हणतात. गीतेच्या ११ व्या अध्यायात या मूर्तीचं वर्णन आहे.तसंच पद्मपुराणातही आहे. या मंदिराचा परिसर मोठा असून मंदिरही शांत, स्वच्छ, ऐसपैस आहे. अखंड काळ्या पाषाणात कोरलेली ही मूर्ती प्रभावलीसह उंचीला ११ फूट आहे. बाजूला दशावतार. माथ्यावर ब्रह्मा-विष्णु-महेश. डाव्या हाताला लक्ष्मी, उजव्या हाताला मांडी घालून भूदेवी. पायाशी जयविजय हे सारे काळ्या पाषाणातील. ब्राह्मी, आवळा व चमेलीचं तेल मूर्तीला लावत असल्याने एक प्रकारची चमक मूर्तींवर दिसते. मेहेकरचं हे मूर्तीवैभव अवर्णनीय आहे. लावण्यमूर्ती असलेला हा शारंगधर हे मेहेकरचं वैभव आहे. अल्लाउद्दीन खिलजीच्या काळातली ही मूर्ती शारंगधर म्हणजे हातात धनुष्य असलेला, हातात शंख, चक्र, गदा, पद्म, पायात तोडे. हेही दगडी घडवलेले. तसेच जानवेही दगडात घडवलेले. सवाशे वर्षांपूर्वी एका इमारतीचा पाया खोदताना तांब्याच्या पेटीत ही मूर्ती सापडली. परचक्र असल्याने त्या काळात ती दडवून ठेवली असावी. मेहेकरला विदर्भ साहित्य सम्मेलन झालं त्यावेळी पु. ल. देशपांडे आपल्या भाषणात म्हणाले होते, 'इथं शारंगधराची मूर्ती आहे. त्या मूर्तीचं लावण्य नाघंच्या कवितेत उतरलं आहे.' किती सुंदर उपमा दिलीय नाघंच्या कवितेला ते शारंगधराची मूर्ती पाहिल्यावर समजतं. मूर्ती खरोखरच लावण्यमयी. आजूबाजूला शांतता, त्या मंदिरातून बाहेर जाऊच नये, त्या मूर्तीला सारखं पहात राहावं, असं वाटत होतं. मूर्तीपुढे माथा टेकवून निघालो. देवालयाच्या मागच्या बाजूला मोकळ्या जागेतून पलीकडे दृष्टी गेली आणि दृष्टी खिळूनच राहिली. वाटेतनं येताना ज्या कंचनी महालाबद्दलचं काव्य आणि त्यातला तो महाल दृगोचर होत होता, आता तो खंडहर आहे. पैनगंगेच्या तीरावरून जणू वाऱ्यावर सूर विरत आले :

*'मीच हा बांधला होता रे महाल : आता हा ओसाड आहे*
*याच्या या दक्षिण दाराच्या बाहेर आता मी दगड आहे*

*दगड नुसता नगड नुसता : मातीत मिळत नाही*
*पाऊसपाण्यात वाकडा तिकडा पडला ठायीच्या ठायी*
*निःशब्द रात्रीत ऐकत बसते होऊन मी भयभीत*
*पश्चिमेकडच्या या पैनगंगेच्या पुराचे उदास गीत'*

कंचनीची व्यथा अशी त्या सूरातून व्यक्त होत होती. कंचनीच्या महालाचं ते धूसर चित्र असं पुढ्यात सूर घेऊन आलं. आता मात्र तेथून काढता पाय घेतला आणि नाघंच्या घराची वाट धरली. गल्लीबोळातून वाट होती. खरं तर मेहेकरमधले सगळेच गल्लीबोळ सारखेच वाटत होते. अजंठा घाटाच्या उतारावरचं हे गाव आहे हे जाणवत होतं. दोन बोळवजा रस्ते पार केल्यावर छोट्याशा गल्लीतलं नाघंचं बैठं घर दुरूनच दिसलं. पुढ्यात आल्यावर घरावरची पाटी स्पष्ट दिसली. ना. घ. देशपांडे ॲडव्होकेट. मी टाकलेलं पत्र त्याच दिवशी दुपारी पण वेळेवर देशपांडे मंडळींकडे पोहोचलं होतं. त्यामुळे मी पुण्याहून ना. घ. देशपांडे यांना भेटायला येत आहे हे कळवल्याने त्यांच्या सूनबाई वाटच पाहात होत्या. घरात शिरतानाच त्यांनी सांगितलं. पाण्याचे प्याले पुढे करून त्यांनी स्वागत केलं. नाघंच्या ॲडव्होकेट चिरंजीवांच्या या पत्नी. ते नुकतेच कोर्टातून येत होते. नाघंना गावात बाबूराव म्हणतात. देशपांड्यांच्या घराण्यातल्या मोठ्या मुलाला 'देसाई' म्हणतात. घरात बाबा म्हणतात. ज्या औत्सुक्यापोटी इथवर आले होते, त्या कविवर्यांच्या दर्शनानेच लक्षात आलं की, ते खूप थकलेले आहेत. आपल्या खोलीतून काठी टेकत टेकत ते त्यांच्या एकेकाळच्या ऑफिसात येऊन बसले. डोक्याभोवती मफलर गुंडाळलेला होता. उंची साधारणपणे पावणेसहा फूट. शरीर वार्धक्यामुळे थकलेलं. नव्वदावं वर्ष चालू. नाकेले, गौरवर्ण, चेहऱ्यावर शांत, संयत भाव, डोळे पाणीदार, भावुक. एवढं वय झालं तरी दृष्टी उत्तम. वाकून नमस्कार केला. वाटलं काहीतरी बोलतील. पण नाघ खुर्चीवर बसून नुसते पहात होते. पाणीदार डोळ्यांत स्निग्ध भाव. सूनबाईंनी सांगितलं ऐकायला कमी येतंय आणि वर्षाभरापूर्वीपासून दुखण्याने बोलतही नाहीत फारसं. बोलले तर एखादा दुसरा शब्द. नाघंच्या कवितेविषयी त्यांच्याशी खूप बोलावं, त्यांच्या कविता त्यांच्या तोंडून ऐकाव्यात, कितीतरी बेत करून आले होते. पण आता सगळंच कठीण होतं. सभोवार पहात नाघ खुर्चीत बसून होते. एक परिपक्व वार्धक्य. मनातल्या मनात खंतावले. दोन-तीन वर्षांपूर्वीच आपण मेहेकरला यायला हवं होतं. सगळं बोलणंच खुंटलं होतं. पण त्यांच्याऐवजी त्यांचे चिरंजीव शिवराम व सूनबाई आमच्याशी गप्पा मारत ती उणीव भरून काढत होते. 'कानाजवळ त्यांच्याशी बोला एखादा शब्द, बोलतील. मधूनच त्यांची स्मरणसाखळी जुळते' असं म्हटल्यावर मी त्यांच्या कानाजवळ सांगितलं. मोठ्यांदा 'आम्ही तुम्हाला भेटण्यासाठी पुण्याहून आलो आहोत.' शांत — स्निग्ध डोळ्यांत भाव उमटले. 'हो का!' एवढे शब्द उच्चारले मात्र खूप बरं वाटलं. मग मी मला आवडणाऱ्या त्यांच्या कवितांबद्दल थोडं बोलले. आणखी काही पण एखाद्या दुसऱ्या शब्दाखेरीज ते जास्त बोलेनात. पण आता चेहऱ्यावर हसरा भाव होता. 'तब्येत बरी नसेल तर त्यांना त्यांच्या खोलीत विश्रांती घेऊ देत.' 'छे! ते बसतील खुर्चीवर' आणि खरंच आम्ही जितका वेळ त्यांच्या घरी थांबलो तितक्या वेळ ते

खुर्चीत बसून राहिले. सूनबाईंनी एका बाजूला गप्पा मारत आमच्यासाठी चहा-पोहे केले. तोपर्यंत नाघंच्या नातीनी आम्हाला घर दाखवलं. घर बैठं, ऐसपैस, स्वत:चं. आम्ही बसलो होतो ते एकेकाळचं नाघ वकिली करत असतानाचं त्यांचं ऑफिस. ते खुर्चीत बसले होते तिथे मागच्या बाजूला वकिलीची पुस्तकं व कागदपत्रं लावून ठेवलेली. पाठीमागे भिंतीवर विवेकानंदांचा फोटो आणि त्याच्यावर कंचनीच्या महालाचा. दोन वर्षांपूवीच त्यांचं 'कंचनीचा महल' हे पुस्तक प्रसिद्ध झालं. त्याच्यात चार दीर्घ कविता समाविष्ट आहेत. समोरच्या दर्शनी भिंतीवरच्या माळ्यावरच्या जुन्या ग्रामोफोनने लक्ष वेधून घेतलं. आता असे ग्रामोफोन क्वचित पहायला मिळतात. नाघंच्या कविता ध्वनिमुद्रिकेतल्या तेव्हा ग्रामोफोन कंपनीने त्याच्या रेकॉर्डस् त्यांच्याकडे पाठवल्या पण त्या ऐकणार कशावर? मग रॉयल्टीच्या बदल्यात कंपनीने हा ग्रामोफोन त्यांना पाठवला. एकेकाळी पन्नास-साठ वर्षांनी याच ग्रामोफोनने तबकडीवरून 'रानारानात गेली बाई शीळ' आणि 'नदी किनारी नदी किनारी' ही बेधुंद करणारी नाघंची गीतं घराघरात रसिकांपर्यंत पोहोचवली.

'अलिकडे कविता वगैरे करतात का?' 'एवढ्यात नाही' पण गतवर्षी त्यांनी लिहिलेली एक कविता 'कोठेही' त्यांच्या चिरंजीवांनी वाचायला आणून दिली.

*'महाराष्ट्रामध्येही पण*
*एकीकडे आहे राही*
*महाराष्ट्रामध्येही पण*
*दुसरीकडे रखुमाबाई*
*जिथे पहावे तेथे आता*
*दोन्हीकडे माझी आई*
*दोन प्रकारचे ही सगळे*
*ज्ञानेश्वर तुकाराम देती ग्वाही*
*यांच्याशिवाय जगतामध्ये*
*कोठेही काहीही नाही'*

अलीकडे त्यांनी काहीही लिहिलेलं नाही. मी नाघंची कविता वाचत होते तेवढ्यात त्यांना विचारलं, 'तुम्हाला तुमची कोणती कविता आवडते?' 'सगळ्याच आवडतात.'म्हणजे मी विचारलेलं त्यांच्या लक्षात आलं होतं. उत्तर ऐकून खूप बरं वाटलं. परत चेहऱ्यावर कुतुहलजन्य पण हसरा भाव. वार्धक्याने क्षीण झालेलं शरीर. त्यात उभ्या आयुष्यात त्यांनी खूप दुखणी काढलेली. फिलॉसॉफीत एम्. ए.च्या टर्मस् त्यांनी विद्यार्थीदशेत भरल्या होत्या. पण त्यांना तीन वेळा टायफाइड झाला. खरं तर त्यांना प्राध्यापक व्हायचं होतं. वकिलीची इच्छा मनापासून नव्हती. पण महाराष्ट्रभर दिगंत कीर्ती आपल्या कवितेला मिळणार आहे हे भविष्यही त्यांना त्यावेळी उमगलं होतं का?

नाघंच्या खोलीमध्ये त्यांना मिळालेले पुरस्कार लावून ठेवलेले होते. पुष्कळ पुरस्कार होते. त्यात ठळकपणे दिसत होतं : महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचं सन्मानपत्र.



अनुक्रमणिका

अभिसारला मिळालेला राज्यपुरस्कार. साहित्य अकादमी पुरस्कार ('खूणगाठी' या कविता संग्रहासाठी). अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलन, परभणी महाराष्ट्र गौरव पुरस्कार, सन्मित्र सभा 'मेहेकर' मानपत्र आणि अलिकडे तीन वर्षांपूर्वी डी. लिट.च्या तोडीचा विदर्भ साहित्य संघाने दिलेला 'साहित्य वाचस्पती' पुरस्कार. विदर्भ साहित्य संघाच्या श्री. द्वादशीवारांनी तो त्यांना घरी जाऊन अर्पण केला. त्याच्या मानपत्रात लिहिलेलं आहे :

*'आदरणीय कविवर्य,*

*मराठी कवितेच्या समृद्ध प्रांगणात खास स्वत:चे असे 'स्वयंभू आणि स्वतंत्र' अधिष्ठान निर्माण करणारा कवी म्हणून महाराष्ट्र तुम्हाला ओळखतो. 'रानारानात गेली बाई शीळ' ही २९ साली लिहिलेली कविता अक्षरश: महाराष्ट्राच्या रानावनात गुंजत राहिली आणि तिने आमच्या कानामनाचा कब्जा घेतला. त्याची मोहिनी अद्याप जशीच्या तशी आहे. तुमची कविताच अशी आहे की, तिचे रंग विटत नाहीत. क्षणाक्षणात शृंगार भावनेचे नवनवे उन्मेष दाखवीत ती चिरतारुण्य, चिरसौंदर्य भावनेला आवाहन करीत आहे...'*

असं आणखीही नाघंच्या कवितेचं हे मानपत्र त्यांच्या अवघ्या कवित्वाचं सार सांगणारं. खरंच, मेहेकरसारख्या आडगावात राहून नाघ कवितेचे मळे फुलवित राहिले. त्यांना त्यांच्या कवितेनी भरभरून मानसन्मान दिले, प्रसिद्धी दिली. पण आपलं मेहेकर सोडून ते कधीही फारसे कविसंमेलनात मिरवताना दिसले नाहीत. किंबहुना आयुष्यभर सभासंमेलनापासून दूरच राहिले. त्यांच्या मेहेकरमधल्या काव्याच्या मळ्याचा सुगंध मात्र महाराष्ट्रभर पसरत राहिला.

नाघंच्या खोलीला लागून असलेल्या खोलीत त्यांच्या वडिलांचा फोटो, त्यांचा स्वत:चा तरुणपणातला फोटो आणि पेन्सिल स्केचनी काढलेला आईचा फोटो. हा नाघंनी स्वत: काढलेला. खरं तर त्यांची आई फारच लवकर गेली. त्यांच्या वयाच्या अवघ्या नवव्या वर्षी. त्यांच्या स्मरणात ती अंधुकशी असणार. चित्रकलेचा त्यांना नाद. त्यातून त्यांनी काढलेल्या चित्रातलं हे आईचं सुंदर स्केच भिंतीवर लक्ष वेधून घेत होतं. सेंदूरजनच्या देशमुखांकडचं त्यांच्या आईचं माहेर. सेंदूरजन हे त्यांचं आजोळ. समृद्ध असं. तिथे त्यांचं आजोळचं घर म्हणजे राजवाडाच. 'सेंदूरजन माझे आजोळ, माझ्या ऐनीचं नंदनवन, माझ्या कवितांवर मोहमंत्र फुंकणारे खेडेगाव' असं नाघंनी सेंदूरजन या आपल्या आजोळगावाविषयी म्हटलंय. मेहेकरपासून जवळच हे गाव आहे. अवघं दहा-बारा मैलांवर. पौराणिक संदर्भ असलेलं गाव. हे नाघंचं जन्मगाव. १९०९ साली नागपंचमीच्या दिवशी त्यांचा जन्म झाला. म्हणून नाव 'नागोराव' ठेवलेलं. वतनदार आजोबांनी थाटात बारसं केलेलं. सेंदूरजनमधली पाताळगंगा आणि कुशावती ही त्यांच्या आजोबांच्या मालकीची जागा. वतनदारी खालसा झाली असली तरी आजोळ समृद्ध होतं. प्राथमिक शिक्षण आजोळी सेंदूरजनला झालं आणि पुढचं आठवीपर्यंतचं शिक्षण मेहेकरला झालं. मेहेकरलाही आजोबांचं घर. तिथे नाघंचे मामा रहात.

पौराणिक संदर्भ असलेल्या सेंदूरजनात 'सीतान्हाणी' नावाचं कुंड आहे. पूर्वेला पाताळगंगा नावाचं कुंड. सीतान्हाणी कुंडाजवळ सीतेला लक्ष्मणाने आणून सोडले म्हणतात. जवळच वाल्मिकीच्या आश्रमाची जागाही दाखवतात. जवळूनच नदी वाहते. भोवताली टेकड्या. असं

निसर्गरम्य दृष्य मनात अनेक कल्पनाचित्रं निर्माण करणारं. म्हणूनच 'सेंदूरजनच्या परिसराने माझ्या कवितांवर परिणाम केलाय' असं नाघ सांगतात. इथे एक प्रचंड ओसाड गढी आहे. गढीत एक आड आहे. आडाच्या भिंतीतून खुरटी झाडे वाढलेली. या झाडीतून पारवे फडफडतात. कधी हुंकारतात. गढीत वाढलेल्या झाडीत रात्री काजवे चमचमतात. आपल्या काही कवितांशी या दृष्याचे निकटचे नाते आहे, असं त्यांनी म्हटलंय.

*'काळ्या गढीच्या जुन्या ओसाड भिंतीकडे*
*आलीस तू एकटी बांधून सारे चूडे*
*वारा किती मंद गऽ होते किती कुंद गऽ*
*होता किती धुंद गऽ अंधार मागेपुढेऽ*
*हुंकारला पारवा तेजाळला काजवा*
*हालून गेला जरा काळोख चोहूकडे'*

या ओसाड गढीचं असं चित्र या कवितेतून उमटलंय. प्रियकराच्या भेटीला येणारी ही कवितेतली अभिसारिका. निसर्गाच्या सचेतनात्वाचे गहिरे रंग या कवितेत उमटलेले दिसतात. एवढंच नाही तर 'गिरीजेचा संसार' या त्यांच्या दीर्घ कवितेतली नायिकाही या सेंदूरजनलगतच्या अजिंठ्यामधल्या घाटातली आहे. इथला परिसर आणि निसर्ग नाघंनी आपल्या लेखणीने काव्यबद्ध करताना. चिरंजीव केलेला

*'हिरवा पिवळा फुटला होता*
*आंब्यावर मोहर*
*निंबारती होता ढवळा*
*लवलवता फुलवर*
*झुळुक लागता लाजत होतं*
*भुरकट पिवळं बन*
*फुले तांबडी उधळत होती*
*पळसफुलांची बनं'*

निसर्गाचं निखळ असं हे चित्र. पुढे नाघंच्या कवितेत अशी कितीतरी निसर्गचित्र ठायी ठायी दिसतात. 'आठवण' कवितेत,

*'लालबुंद कुंकवाची कोर तुझ्या भाळी होती*
*बारवेच्या काठावर तुझी भेट झाली होती*
*मी काही विचारले, तेव्हा,*
*लगेच जाताना मात्र बोललीस मनोहर*
*'नाही अजून फुटला बाई, आंब्याला मोहर'*
*मोहरली आहे आता भोवताली आंबेराई'*

भिंतीवरचं चित्र पाहता पाहता सेंदूरजनचा परिसर डोळ्यांपुढे असा सजग झाला. 'नाघंचं काव्य शहरापासूनच नव्हे तर गावापासूनही दूर राहते. त्यातील निसर्गसौंदर्य अनुषंगाने आलेलं,

आपल्याच मर्यादित परिघात त्यांची कविता गुंगलेली आहे, 'असं जरी मं. वि. राजाध्यक्ष यांनी म्हटलं असलं तरी त्यांची कविता वाचल्यावर त्यांच्या नादाइतकीच त्यातील शब्दचित्रे फार काळ मनात लटळत राहतात, असं त्यांनी स्वच्छपणे लिहिलं आहे आणि हेच त्यांच्या अवघ्या कवितेचं सामर्थ्य आहे, असं मला वाटतं.

*'हुंकारला पारवा*
*तेजाळला काजवा*
*हालून गेला जरा काळोख चोहूकडे'*

किंवा

*'जरा निळ्या अन् जरा काजळी*
*ढगात होती सांज पांगली*
*ढवळी ढवळी वर बगळ्यांची संथ भरारी गऽऽ !'*

अशी सुंदर नाद आणि शब्दचित्रं खास नाघंच्याच कवितेत उमटतात. आणि हा केवळ नाघंच्याच प्रतिभेचा धर्म आहे. त्यामुळे त्यांची कविता गीतात्म असूनही तिच्यामध्ये श्रेष्ठ दर्जाच्या विशुद्ध भावकवितेचे अनेक विशेष आढळतात. अनेक असे भावविभोर क्षण नाघ आपल्या प्रतिभेच्या कुंचल्यानी काव्यबद्ध करतात. नाघंच्या कविता मनात एकापुढे एक उमटत होत्या. साक्षात या कवितेचा जनकच समोर होता. मनात विचार आला की हे कवित्व नाघंमध्ये कसं झरलं असेल बरं ! ते आलं वडिलांकडून. वडील साखरखेड्याचे. ते त्यांचे मूळ गाव. हे ऐतिहासिक महत्त्व असलेलं गाव. इथलं पटवारीपणाचं वतन देशपांड्यांकडे होतं. शिक्षणाच्या निमित्ताने नाघ मेहेकरला व त्याआधी सिंदूरजनला आजोळी राहिले. त्यामुळे वडील मधूनमधूनच भेटत. अथवा वर्षातून २-३ वेळा नाघ आपल्या गावी जात. वडील फारसे भेटत नसत. ते सावरकरभक्त होते आणि टिळकभक्तही. ते कविता करत. देशभक्तीपर आणि राष्ट्रभक्तीपर. नाघ आपल्या वडिलांसारखे दिसतात. त्यांचे चिरंजीव सांगत होते. खरंच पुष्कळ साम्य होतं. नाघंचं शिक्षण मेहेकरच्या सरकारी ए. व्ही. स्कूलमध्ये आठवीपर्यंत झालं. नाघ आणि त्यांचे बंधू विघ नंतर राष्ट्रीय चळवळीमुळे ही शाळा सोडून राष्ट्रीय शाळेत दाखल झाले. राष्ट्रीय शाळेत आखाड्यात जावे लागे. वार्षिक परीक्षेच्या वेळी मेहेकरमधल्या शारंगधराचं, नृसिंहमूर्तीचं, दत्ताचं दर्शन घेतलं जायचं. पुढचं शिक्षण खामगाव आणि नंतर नागपूरला झालं. या नागपूरच्या रहिवासात त्यांना गोविंदराव जोशी भेटले. ज्यांनी त्यांची 'शीळ', 'नदीकिनारी' ही कविता गायली. आणि इतरही. नाघंचे वडील फार गोड गळ्यावर गात. पुढे नाघंच्या पत्नी शांता नाघंच्या कविता चाली लावून गात असत. नाघंच्या वडिलांचा-आईचा फोटो पाहून आम्ही त्यांचं घर आणि घराचा परिसर पाहून येईपर्यंत नाघ खुर्चीतच बसले होते. तेवढ्यात गावातच राहात असलेली त्यांची कन्या आली. भाग्यश्री कविमंडन. त्या शाळेत शिकवत आणि जावईही. चिरंजीव शिवराम त्यांच्या वकिलीचा वारसा पुढे चालवत आहेत. आणखी एक कन्या आणि चिरंजीव प्रताप हे बँकेत आहेत. कन्या भाग्यश्री आपल्या प्रतिभावंत पित्याविषयी म्हणाल्या, 'त्यांच्याबद्दल फार मोठेपणा वाटतो. ते स्वभावाने अतिशय शांत. तसेच शिस्तप्रिय.

काव्यात जास्त गुंगत असत. नातू त्यांना टाइम्स वाचून दाखवतो. सगळेजण त्यांना खूप जपतात. बद्धकोष्ठाचा त्रास नाघंना खूप जुना आहे. त्यातच त्यांनी गतवर्षी चूर्ण जरा जास्त घेतलं आणि त्यातच ते आजारी झाले. त्यांना विस्मृतीही होऊ लागली. चिरंजीव शिवराम व घरची सर्वचजण त्यांना त्यामुळे खूप जपतात. एवढी मोठी व्यक्ती सांभाळणे ही मोठी साहित्यसेवाच आहे, असं त्यांच्या चिरंजीवांबद्दल म्हणावं लागेल.'

गावाला पूर्व भाग सोडून पैनगंगेचा वेढा असलेलं आणि डोंगर उतरणीवर असलेलं मेहेकर आता सांध्यरंगात बुडायला लागलं आणि इकडे आम्ही नाघंच्या एकेक कविता आठवत होतो. त्यावर बोलत होतो. घड्याळ पुढे सरकत होतं. सांज कलत होती. नाघंच्या चिरंजीवांनी हार्मोनियम आणला.

*'सांज हासली सजणी सांज हासली*
*विभक्त पाखरे पुन्हा विजन भेटली*
*भोवती मुके दाटले धुके दाटले धुके*
*सांज हासली सजणी सांज हासली'*

अतिशय सुंदर चालीत त्यांनी आपल्या वडिलांची कविता गाऊन दाखवली. आता काव्यगायनाला रंग भरत होता आणि गंधानाही. वडिलांच्या भेटीच्या निमित्ताने साहित्य क्षेत्रातली खूप मोठी मंडळी इथे घरी येऊन गेली हे त्यांनी आवर्जून सांगितलं. तुम्हाला तुमच्या वडिलांनी लिहिलेल्या कविता कुठे कशा लिहिल्या हे काही सांगता येईल? मामांच्या माडीवर असताना त्यांनी 'मालन' कविता लिहिली. 'डाव मांडून मांडून मोडू नको' आणि अनेक गाजलेल्या कविता, आम्ही आजीच्या घरात रहात होतो, तिथे लिहिलेल्या. ६४ सालापर्यंत ते तिथे रहात होते. नाघंच्या पत्नी त्यावेळी होत्या. त्या या घरात त्यांच्या कविता गात. हे गाणं चिरंजीवांकडे आईकडून आलेलं.

गीतांजलीचं मीटर लावलेलं अशी कविता त्यांनी गाऊन दाखविली.

*'सृष्टी हसेल पुष्पवेला हसेल उषा लेवून शाल*
*चाफा सुगंधमय देईल सय दूरच्या सजणाची.'*

आणि मग त्यांनी म्हणायला घेतली शीळ. १९२९ सालापासून ही 'शीळ' अजूनही ताजीच आहे. ही लिहिली गेली नागपूरला. पण वातावरण सेंदूरजनचं. नाघ कॉलेजात शिकत होते. एका मित्राकडून रात्री मेवे खाऊन परत येत असताना त्यांच्याभोवती कवितेचं वातावरण तयार झालं. सेंदूरजनचं वातावरण समोर आलं. दुरून बासरीचे मंजूळ स्वर येऊ लागले. नागनदीचे डबकेही चांदण्यात रूपेरी दिसू लागले. एक सुंदर प्रेयसी त्यांच्याकडे येऊ लागली. ती त्यांना म्हणू लागली,

*'राना रानात गेली बाई शीळ'*

सेंदूरजनचा निसर्ग सचेतन होत होता. ती म्हणाली, 'थोर राया तुझं हे कुळशीळ' कविवर्य कृष्ण. ती म्हणाली, 'जसा काही ग मोहन कान्हा' कविवर्य हसले. ती म्हणाली, 'हासे जसा ग राम घननीळ' अशा सुंदर लीला लाघवात अवघ्या दहा मिनिटात ही कविता नाघंनी










त्यावेळी रचली. संवेदनशील अशा कविमनाने अत्यंत तरल असं हे गीत मराठी काव्यगंगेला दिलं. नाघंच्या चिरंजीवांनी चढ्या आवाजात 'शीळ' गायली. नाघंपर्यंत ती पोहोतच होती का? फक्त ते औत्सुक्याने सभोवार सारखे पहात होते. यानंतर शिवराम यांनी गायली

*'कसले जीवन आता नुसते नुसते मरणच उरले रे*
*झडली पाने पुष्प पहिली काट्यांच्या खाईत राहिली...*
*नीज हरवली उरले वादळ...*
*दिवाच विझला उरले काजळ...*
*शून्य मनाने बसतो वाचीत*
*तिमिरामधले निर्दय संचीत*
*कसले जीवन आता जीवन*
*नुसते मरणच उरले रे...'*

नाघंनी एकदा अतिशय आजारी असताना ही कविता रचली होती. कविता ऐकताना मनावर एक ताण आला. गजानन वाटवेंनी ही कविता गायली आहे. एक अनामिक हुरहुर मनात दाटली. ती व्यक्त करणंही उचित नाही. पण ती हुरहुर खूप वेळ मनाला व्यापून राहिली. मघापासून असं का होतंय कळेना. 'शीळ' कवितेचं गायन ऐकत असताना मला 'तिची माझी फुलवेल' या नाघंच्या कवितेतल्या —

*'अज्ञात दिवसाचा देत इशारा येते ही*
*शिरी घुमत आकाश गाभाऱ्यातून*
*शहारून बसलो मी एका कोपऱ्यात*
*अंग माझे चोरून एकटा*
*गोळा करून माझे हे चिंध्या झालेले कपडे*
*बांधून एकटं सारे पुढच्या प्रयाणासाठी'*

या ओळी स्मरत होत्या. थोडा वेळ शांततेत गेला आणि 'नदीकिनारी' कवितेविषयी गप्पा निघाल्या. ही कविता कशी लिहिली, त्याबद्दल नाघंनी लिहिलंय. ही कविता मला फार आवडते आणि 'घर दिव्यात मंदतरी.'

*'घर दिव्यात मंद तरी*
*बघ अजून जळते वात*
*उजळल्या दिशा सजणा*
*नकळताच सरली रात'*

या कवितेतलं वातावरण एका प्रसन्न खेड्याला साक्षातपणे समोर आणतं. खेड्यातील निसर्ग, माणसं, दैनंदिन जीवन.. पण खरं म्हणजे ही कविता कशी सुचली हे नाघ लिहितात, 'एकदा भल्या रात्री खालच्या रस्त्यावरून कोणी बाई पाण्याची कळशी कमरेवर घेऊन जायची. त्यावेळी आम्ही माडीत निजत असू. तिच्या कळशीतल्या पाण्याचा आवाज येत असे. वर आभाळात चांदणं. छपरीत चिमण्यांची चुळबुळ जाग आणत असे. परस्पर स्पर्शाची धुंदी सरत



अनुक्रमणिका

नसे. हा रात्रीचा अनुभव मनात खोल रूजून तिचा विकास या कवितेत झालाय.

'नदीकिनारी'बद्दलही म्हणजे तिच्या जन्मकथेबद्दलही नाघ प्रांजळपणे सांगतात. मेहेकरजवळच्या शेतातून मामांबरोवर चाललो होतो. वाटेत नदी. नदीजवळ पोहोचलो. आभाळात सांजेचे ढग. वरून बगळ्यांचा थवा येत होता. मंत्रमुग्ध करणारं दृश्य. मामा पुढे आणि मी मागे भारावल्यासारखा चालत येत होतो. एक प्रौढ मुलगी नदीवर पाठमोरी, धुणं धूत होती. तिच्या चेहऱ्यावर स्मित. भारावल्या स्थितीत नाघंच्या काव्यपंक्ती जुळून गेल्या.

*'नदीकिनारी नदीकिनारी नदीकिनारी गऽ*
*अवतीभवती नव्हते कोणी*
*नाचत होत्या राजसवाणी*
*निळ्या जळावर सोनसळीच्या नवथर लहरी गऽ*
*जरा निळ्या अन् जरा काजळी*
*ढगात होती सांज पांगली*
*ढवळी ढवळी वर बगळ्यांची संथ भरारी गऽऽ'*

कवितेच्या ओळी ऐकायला छान वाटत होत्या आणि आठवणीही पण. आता निघायला हवं होतं. ज्या घरात नाघंचं बालपण गेले ते घर त्यांच्या घरासमोरचं. तिथे त्यांचे मामेभाऊ राहतात. तिथे जायचं होतं. नाघंचा निरोप घेतला. त्यांनी हात हलवला. एवढा वेळ त्यांना खरं तर खुर्चीत बसणं शिक्षाच होती. पण आम्ही निघेपर्यंत ते बसले. सूनबाईंनी परत या म्हणून दारात निरोप दिला. चिरंजीव आमच्याबरोबर आले. आम्ही मामांच्या घरी गेलो. ऐसपैस आणि पुढे मोठं आवार असलेलं घर. त्यांच्या मामेबंधूंनी खूप आठवणी नाघंच्या सांगितल्या. 'चिरदाहक चिंतनात...' ही कविता त्यांनी या घरात रचलेली. त्यावेळी खूप आजारी झाले होते. खुंटीला उपरणे बांधून त्यांचे पाय बांधून ठेवले होते. इतका अशक्तपणा नाघंना आला होता म्हणे. सेंदूरजनच्या घराबद्दल ते अगदी भरभरून बोलले. दलित सवर्णवाद असतानाही त्या काळात सेंदूरजनची पाण्याची विहीर त्यांच्या आजोबांनी खुली करून दिली होती. कपाशीचा व्यापार आणि कापडाचं दुकान सेंदूरजनला वैभव होतं त्यावेळी. या आठवणी न संपणाऱ्या. त्यांचा निरोप घेऊन निघालो. कोपऱ्यावर वळणावर गल्लीच्या शेवटी डाव्या हाताच्या घरात नाघंचे चिरंजीव घेऊन गेले. या घरात नाघ २५ वर्षं राहिले. इथे त्यांनी सुटाबुटात वकिलीचा व्यवसाय केला. सुटाबुटात वावरणारे मेहेकरमधले ते एकमेव वकील होते. मेहेकर एज्युकेशन सोसायटीचे प्रेसिडेंट होते. या घरात त्यांनी अनेक कविता लिहिल्या. मुलांचं बालपण इथे गेलं. माडीवर त्यांची पत्नी शांता हार्मोनियमवर चाली लावून नाघंच्या कविता गात असे. 'डाव मांडून मांडून मोडू नको' किंवा 'प्रिया आज माझी नसे साथ देण्या' या कविताही त्यांनी इथेच लिहिल्या. ज्या सुधीर फडक्यांनी चाली लावून गायल्या. पण नाघंच्या कवितेची स्फूर्तिदेवता त्यांची प्रिय पत्नी याच घरातून त्यांना सोडून गेली. त्यालाही आता २५ वर्षं लोटली. या घरात त्यांच्या प्रिय पत्नी भाजून अपघाती मृत्यू पावल्या. नेहमी आपल्या पतीच्या कविता चाली लावून गाणाऱ्या 'शांता' नी मरण समयीही त्यांची कविता म्हटली,











*'केव्हाची गेलीस रे, मधुर निशा*
*सोडून शयन*
*हासते दंव हे उन्हात सख्या*
*उघड नयन*
*सोडून मोकळे कुंतल काळे*
*मी एक चंचल कंचनी झाले*
*तुला मी टाकून मोहक जाळे*
*करीन बंधन*
*हासते दंव हे उन्हात सख्या*
उघड नयन'

हे सारं ऐकून मन विषण्ण झालं. पत्नीच्या मृत्यूनंतर किसन आरार्णीचं हे घर सोडून त्यांनी हे आताचं घर घेतलं ते आपल्या आजोळच्या घरासमोर. नाघंच्या कवितेला मानसन्मान मिळाले. पुरस्कार मिळाले. पण ते भाग्य पहायला पत्नी हयात नव्हती.

नाघंच्या चिरंजीवांचा निरोप घेतला. रात्र चढली होती. आता परतीचा प्रवास होता. मंद चांदणं पडलेलं होतं. नाघंच्या कवितेची अनेक शब्दचित्रं बरोबर होती. चांदण्याच्या प्रकाशात ओठावर त्यांच्या कवितेतल्या (धनगरी गाणे) ओळी येऊ लागल्या. त्याला लोकगीताची लय आहे.

'या माथ्यावरती ठळक चांदण्या नऊ
ही अवतीभवती हिरवळ हिरवी मऊ... ऽऽजी'

नाघंची कविता आजही या हिरवळी सारखी मऊ, सतेज, टवटवीत आहे.

❑

डॉ. मंदा खांडगे
२४, ऋणानुबंध, डी.पी. रोड, औंध, पुणे ७

---

## स्वागत

- ❑ **बिनशेपटीचा माणूस :** क. दि. सोनटक्के, देशमुख आणि कं. पुणे. पृष्ठे २१७
- ❑ **निशिगंध :** शरयू म. दुराफे, शारदा प्रकाशन, ठाणे. पृष्ठे ५७
- ❑ **अवाक्षर :** अवधूत परळकर, नरेंद्र गंगाखेडकर, पृष्ठे १३२
- ❑ **सुंदर होऊ सगळे :** कि. ना. गंगावणे, प्रकाशक जनार्दन गंगावणे, वाशीम. पृष्ठे ३२
- ❑ **चिन चिन चिनू :** शरयू म. दुराफे, शारदा प्रकाशन, ठाणे. पृष्ठे २९
- ❑ **वीरबाला :** सरिता वैद्य, दत्तात्रय बर्वे, पुणे. पृष्ठे ७८
- ❑ **मोराचं पीस :** संतोष मुळावकर, साकेत प्रकाशन, औरंगाबाद. पृष्ठे २४
- ❑ **माणूस नावाचा शत्रू :** गणपत व्यास, साकेत प्रकाशन, औरंगाबाद. पृष्ठे २४
- ❑ **मुक्ती गाथा :** ललिता शिंदे, दत्ता डांगे, नांदेड. पृष्ठे ६४

---



अनुक्रमणिका






अनुक्रमणिका

# संत वाङ्मय आणि विज्ञानानुभव

डॉ. अरुण निगवेकर

संत वाङ्मय हे जीवनाच्या बहुतेक सर्व पैलूंना स्पर्श करीत असते. ज्ञानेश्वर हा तर गेली ७०० वर्षे एक अभ्यासाचा व चिंतनाचा विषय बनला आहे. तसे बघितले तर ज्ञानेश्वरी, अमृतानुभव आणि चांगदेव पासष्टी हे संत वाङ्मयात आढळणारे तत्वज्ञानाचे मुलाधार ग्रंथ आहेत. या तीन ग्रंथांना संत वाङ्मयाची प्रस्थानत्रयी असेही खूपदा म्हटले जाते.

चांगदेव पासष्टीमध्ये चांगदेवांना उद्देशून लिहिलेल्या ६५ ओव्या आहेत. ज्ञानेश्वरांनी आपल्या वडीलबंधूंच्या म्हणजे निवृत्तीनाथांच्या सांगण्यावरून योगीराज चांगदेवांच्या कोऱ्या पत्राला लिखित स्वरूपात धाडलेले हे एक ओवीबद्ध उत्तर आहे. योगीराज चांगदेव हे योग सामर्थ्याने स्वत:ला मोठे समजत होते. त्यांना संत योगी ज्ञानेश्वरांची व त्यांच्या अलौकिक विद्वत्तेची कल्पना नव्हती. ज्ञानेश्वरांची परीक्षा घेण्याकरिता त्यांनी कोरे पत्र पाठविले. तर ज्ञानेश्वरांनी ओवीबद्ध स्वरूपात पत्ररूपाने तत्वज्ञानाची ओळख योगीराज चांगदेवांना करून दिली. हे पत्ररूपी उत्तर वाचून चांगदेव जातीने ज्ञानेश्वरांकडे आले. आपले योगसामर्थ्य व त्याचा दरारा दाखविण्यासाठी ते वाघावर बसून आले. त्यांनी विखारी नागाचा चाबूक केला. त्यांना दाखवायचे होते की, योगबलाने अत्यंत क्रूर व सजीव प्राण्यांवर मी मात करू शकतो. पण ज्ञानेवरांनी त्यांना वेगळ्याच प्रकारे उत्तर दिले. निर्जीव भिंतीवर बसून, तिला चालवीत ज्ञानेश्वर भावंडे योगीराज चांगदेवांना सामोरे गेले. निर्जीव भिंतीवर ज्ञानेश्वरांचे नियमन बघून योगीराज चांगदेव भारावून गेले. एका दृष्टीने ज्ञानेश्वरांचा श्रेष्ठ अधिकार नकळत सिद्ध होऊन गेला.

चांगदेव पासष्टीला 'सातवे दर्शन' असे संबोधिले जाते. या ६५ ओव्या जीवनाचे आगळेवेगळे दर्शन घडवितात. या छोट्याशा पुस्तकात खूपच आशय भरला आहे. याच्यामध्ये अद्वैत वेदांताच्या शिरोभागी असलेले पूज्य आद्य शंकराचार्यांचा कर्मवाद तर नाही, पण इथे भावनेला जागा नाही. पुनर्जन्माचा सिद्धांतही मांडला नाही. एका दृष्टीने हे वेगळेच पुस्तक आहे. याच्यामध्ये विश्वोत्पत्तीच्या रहस्याची उकल आहे. विश्व कसे बनले? ते कशातून निर्माण झाले? विश्वात असणारे सजीव व निर्जीव गोष्टींचा एकमेकांशी संबंध काय? अशा प्रश्नांची तार्किक चर्चा येथे केली आहे. परंतु विशेष महत्त्वाचे म्हणजे ही सर्व चर्चा 'वैज्ञानिक' दृष्टिकोनातून केलेली आहे. चांगदेव पासष्टीचा विषय व उद्देश यांचा संबंध बादरायणाच्या चतु:सूत्रीशी लावता येतो. या सूत्री म्हणजे अथतो ब्रह्म जिज्ञासा, अहं ब्रह्मासि, ब्रह्म सत्यं जगमिथ्या आणि जीवो ब्रह्मवनापरा: या आहेत. ज्ञानेश्वरांनी मात्र आपले सर्व तत्त्वज्ञान केवळ तीन शब्दात सांगितले आहे आणि ते तीन शब्द म्हणजे 'असणे, दिसणे आणि होणे' हे होत. अशा तीन सोप्या शब्दांच्या आधारे त्यांनी विश्वातील

प्रत्येक गोष्टीचा रहस्यभेद केला आहे. सृष्टीत दिसणाऱ्या व घडणाऱ्या प्रत्येक गोष्टीबद्दल आपल्याला कुतूहल असते. जे दिसते ते नाकारायचे कसे? आणि हे जे सगळे घडते... म्हणजे 'होते'... ते तसे का? असे प्रश्न विचारीत आणि प्रश्नांच्या उत्तराला दृष्टांताची जोड देत ज्ञानेश्वरांनी सुस्पष्ट असे विचार मांडले आहेत.

या विचारांच्या मागे एक प्रकारची शास्त्रीय बैठक असल्याची जाणीव होते. प्रत्येक घटनेमागे काहीतरी तत्त्वे आहेत आणि त्या तत्त्वांची पूर्ती म्हणजेच जिज्ञासा पूर्ती. अशा प्रकारचा विचारांचा ओघ या पुस्तकातून आढळतो. तसे बघितले तर जिज्ञासा व तिच्या पूर्तीचे तात्त्विक व प्रात्यक्षिकयुक्त प्रयत्न म्हणजे विज्ञान होय. आधुनिक वैज्ञानिकांनी जड वस्तू व चैतन्य यांच्यातील एकमेकांच्यावरील नात्यांचा आधार घेत सृष्टीची निर्मिती प्रक्रिया व वस्तुस्थिती यांचे विश्लेषण केले आहे. या विश्लेषणास प्रात्यक्षिक पुरावे देत विश्वाबाहेर एक प्रकारचे नियम बनविले आहेत.

सापेक्षता सिद्धांत व पुंज सिद्धांत यांनी एका नवीन विज्ञानाला जन्म दिला. या नवविज्ञानाच्या प्रगतीमध्ये विश्व निर्मितीची प्रक्रिया व स्वरूप याला एक नवीनच अर्थ प्राप्त झाला. असे जरी असले तरी पुष्कळ वैज्ञानिकांना यातून विश्वनिर्मितीचे अंतिम सत्य मिळेलच की नाही याबद्दल शंका आहे आणि याच ठिकाणी अध्यात्म चित्रामध्ये येऊ लागते. आईनस्टाईनने तर म्हटले आहे की, विज्ञान व अध्यात्म या एकाच नाण्याच्या दोन बाजू आहेत.

गणित व निरीक्षण यांचा उपयोग करून वैज्ञानिक विश्वाची रहस्ये सोडवू पाहतात. विश्व थोडेफार समजले आहे असे वाटते ना वाटते तोच अशा काही घटना घडतात की, विश्वाबाबतचे गूढ अधिकच गडद होत जाते. विज्ञानाच्या आधारावर माहिती झालेल्या ज्ञानाला पण काही मर्यादा आहेत व निसर्गातील अंतिम सत्य हे माणसाने अवगत केलेल्या ज्ञानाच्या पलीकडे जाते. काळ, अवकाश, जड वस्तू आणि चैतन्य व तसेच गुरुत्वाकर्षण हे जरी विश्व निर्मितीचे घटक आहेत तरी या सगळ्यांना एकत्रित बांधून सुसूत्रपणे व योजनाबद्ध काम कोण करावयास लावते हा पण एक प्रश्नच आहे. यावरून असे म्हणता येईल की, वैज्ञानिक दृष्टीतून विश्व समस्तांना जी काही सापेक्षता जाणवते ती विज्ञानाचा कणा ठरते. परंतु याच्या पलीकडे जाऊन विश्वाचे सत्य स्वरूप जर माहिती करून घ्यावयाचे असेल तर निरपेक्षतेची जरूरी आहे आणि नेमकी हीच निरपेक्षता आणि त्याची अनुभूती वैज्ञानिकांना सतावते. याचा अर्थ मानवाला जाणवणारे विश्व हे जरी इंद्रियसापेक्ष असले तरी आध्यात्मिक दृष्ट्या ते इंद्रिय निरपेक्षच आहे.

श्री संत ज्ञानेश्वर हे एका दृष्टीने आध्यात्मिक वैज्ञानिकच आहेत. त्यांनी विश्वाचे वैज्ञानिक विदित स्वरूप तर मांडलेच पण तेथे न थांबता त्याच्याही पलीकडे जाऊन विश्वाची गूढता त्यांनी वैचारिकरित्या समजावून सांगितली आहे. चांगदेव पासष्टी ही अशा विषयांना छेदून गेली आहे. कै. मधुकर आष्टीकरांनी चांगदेव पासष्टीकडे आणि विज्ञानाशी निगडीत असलेल्या अनुभवांकडे अलग अलगरित्या न पाहता एकत्रितरित्या पाहिले आहे. या कारणाने हा विषय नवीन











विज्ञान व अध्यात्म यांना एकत्रित घेऊन पुस्तकात सहजपणे तत्वरूपरित्या उलगडून सांगितला आहे. सर्व विषय मोठ्या मनोरंजक रूपात सहज उत्स्फूर्त भाषेचा वापर करीत आणि मार्मिक दृष्टांताचेही दाखले देत मांडलेला आहे. एका दृष्टीने लेखक हा वाचकांशी संवादच करीत आहे असे वाटते. हे संपूर्ण पुस्तक संवाद करीत गोष्टींचा आधार घेत व त्यातून अनुभव देत अध्यात्म व विज्ञान यांच्यावर एक प्रकारचा संवाद करीत आहे. हे पुस्तक म्हणजे एक सकस व उत्तम जीवनानुभव आहे. कै. मधुकर आष्टीकरांनी मराठी वाङ्मयामध्ये एक अत्यंत महत्त्वाची भर घातली आहे व ते समृद्ध केले आहे. आळंदी संस्थानाने पण हे पुसतक प्रकाशित करून चांगला पायंडा पाडला आहे.

❑

डॉ. अरुण निगवेकर
कुलगुरू, पुणे विद्यापीठ, पुणे ४११ ००७.

श्री चांगदेव पासष्टी व विज्ञानानुभव
डॉ. मधुकर आष्टीकर,
पृष्ठे ९६, मूल्य रु. ५०/-
श्री ज्ञानेश्वर महाराज संस्थान कमिटी,
आळंदी यांचे प्रकाशन

---

## स्वागत

- ❑ **समुद्रातील राज्यात राजू :** सुभाष वसेकर, साकेत प्रकाशन, औरंगाबाद. पृष्ठे १६
- ❑ **मित्र जीवाचा बरा :** लीला शिंदे, साकेत प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे १६
- ❑ **परीचे अश्रू :** सुभाष वसेकर, साकेत प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे १६
- ❑ **गोड्डुली गाणी :** रजनी लिमये, जान्हवी वैशंपायन, नाशिक. पृष्ठे २७
- ❑ **फुलझडी :** इंदुमती जोंधळे, साकेत प्रकाशन, औरंगाबाद. पृष्ठे २४
- ❑ **नैतिक मूल्यांचे शिक्षण :** स.ध.झामरे, साकेत प्रकाशन, औरंगाबाद. पृष्ठे १६३
- ❑ **गणित कसे शिकवावे :** भा.स.फडणीस/वाड, साकेत प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे ४१
- ❑ **प्रिय आई बाबा :** सुशिल सुर्वे, साकेत प्रकाशन, औरंगाबाद
- ❑ **डाळिंबासाठी ठिबकसिंचन :** जनार्दन - आशा कदम, साकेत प्रकाशन, औरंगाबाद. पृष्ठे ५८
- ❑ **प्रॉम्प्टिंग :** चंद्रभूषण कुलश्रेष्ठ, साकेत प्रकाशन, औरंगाबाद. पृष्ठे ४८
- ❑ **कौटुंबिक न्यायालय कायदा १९८४ :** डी. एस. कोरे, साकेत प्रकाशन, औरंगाबाद. पृष्ठे ९५
- ❑ **आदिवासींचे शिक्षण :** गोविंद गारे, साकेत प्रकाशन, औरंगाबाद. पृष्ठे २४१
- ❑ **मराठी व्याकरणाचा अभ्यास :** स. ध. झांबरे, साकेत प्रकाशन, औरंगाबाद. पृष्ठे १४६
- ❑ **जेव्हा सूर बोलू लागतात :** दीपकळी नाईक, अपर्णा प्रकाशन, मुंबई. पृष्ठे ८४
- ❑ **पाकिस्ताननामा :** अरविंद व्यं. गोखले, पद्मगंधा प्रकाशन, पुणे, पृष्ठे १६०
- ❑ **आत्मविभोर :** कल्याण इनामदार, पद्मगंधा प्रकाशन, पुणे. पृष्ठे ११२
- ❑ **लोकशिक्षक गाडगेबाबा :** डॉ. रामचंद्र देखणे, पद्मगंधा प्रकाशन, पुणे. पृष्ठे १४०



अनुक्रमणिका






# यदुनाथ थत्ते - साहित्यिक आणि सामाजिक कार्यकर्ता

डॉ. अनिल गोडबोले

## साने गुरुजींचा धडपडणारा मुलगा

यदुनाथजी गेले. समाजाच्या विविध क्षेत्रात स्वत:चा असा स्वतंत्र ठसा उमटवणारं एक आगळं-वेगळं व्यक्तिमत्त्व काळाच्या पडद्याआड गेलं. मृत्यूच्या अखेरच्या क्षणापर्यंत चालणारी एक अखंड धडपड शांत झाली. यदुनाथजी गेल्यानंतर अनेक वृत्तपत्रांनी व प्रसार माध्यमांनी त्यांचं वर्णन साने गुरुजींचा धडपडणारा मुलगा असं केलं आहे ते अगदी यथार्थ आहे. पण या विधानाच्या मागे किती खोल अर्थ दडलेला आहे? त्यातील आशयाचे विविध पदर किती जणांच्या लक्षात आले असतील या बद्दल मनात शंका येते. गेली ३५ वर्षे म्हणजे इयत्ता तिसरीत/चौथीत असल्यापासून मी त्यांना पाहात आलेलो आहे. साने गुरुजी कथामालेचे काम करण्याच्या निमित्ताने मला त्यांचा अनेक वर्षे बऱ्यापैकी सहवास लाभला. त्यामुळे त्यांच्याबद्दलच्या आठवणीनं माझं मन व्याकूळ झालं आहे. कमीत कमी साने गुरुजी जन्मशताब्दीचा आनंद सोहळा पाहायला तरी यदुनाथजी हवे होते, असं राहून राहून वाटतं.

## यदुनाथजींचे साहित्य

साधना कार्यालयात विचारणा केली असता यदुनाथजींच्या नावावर आत्तापर्यंत साठ पुस्तके प्रसिद्ध झाली आहेत, अशी माहिती मिळाली. त्याशिवाय साधनेतून त्यांनी केलेले लेखन, दैनिकांमधून आणि नियतकालिकांमधून त्यांनी विपुल प्रमाणात केलेले लेखन आणि त्यांचे प्रकाशित व अप्रकाशित साहित्य या साऱ्यांचे जर संकलन केले तर एक भला मोठा ग्रंथराज होऊ शकेल. अखिल भारतीय मराठी बाल-कुमार साहित्य संमेलनाने यदुनाथजींची अध्यक्ष म्हणून निवड करून त्यांच्या साहित्यसेवेचा एक प्रकारे यथार्थ गौरव केला.

साने गुरुजींच्या प्रमाणे यदुनाथजी हे सुद्धा बाल-गोपाळांच्या सहवासात रमून जात. मुलांसमोर ते गोष्टी सांगताना कसे रंगून जात हे मी स्वत: अनुभवलेले आहे. देऊळ, वैज्ञानिकांच्या चरित्र-कथा, साने गुरुजी, महात्मा गांधी यांची चरित्रे यासारखी काही पुस्तके त्यांनी खास बालांसाठीही लिहिली. पण यदुनाथजींची बालांपेक्षाही युवकांशी अधिक जवळीक. त्यांचे बरेचसे लेखन युवक वर्गासाठी आहे. या संदर्भात त्यांच्या 'युवाशक्तीला आवाहन' या पुस्तकाचा आवर्जून उल्लेख करायला हवा. युनोने १९८५ हे अंतरराष्ट्रीय युवक वर्ष म्हणून जाहीर केले. ही पर्वणी साधून युवाशक्तीला नवी धडपड करण्यासाठी आवाहन करावे या हेतूने या पुस्तकाची निर्मिती झाली. त्यात त्यांनी युवकांना करता येण्यासारख्या अनेक कामांची सांगोपांग आणि सविस्तर चर्चा केली आहे. पण त्याहीपेक्षा या पुस्तकाचे खरे वैशिष्ट्य म्हणजे यदुनाथजींनी युवकांच्या साठी तयार करावयाच्या आचार संहितेचा आराखडा. आज या काळात सुद्धा युवकांसाठी काम



अनुक्रमणिका






करणाऱ्या संस्था आणि संघटनांनी या पुस्तकाचा व त्यातील आराखड्याचा सखोल अभ्यास करावा.

## 'पुढे व्हा' आणि 'यशाची वाटचाल'

स्वेट मार्डेन यांच्या पुस्तकाचा आधार घेऊन यदुनाथजींनी स्वत:च्या स्वतंत्रशैलीत लिहिलेल्या (त्यांच्याच भाषेत सांगायचे तर कलम केलेल्या) दोन पुस्तकांचा आवर्जून उल्लेख करायला हवा. त्यातील एक पुस्तक म्हणजे 'पुढे व्हा' (मूळ पुस्तक : पुशिंग टू दी फ्रंट). या पुस्तकाने तरुण मनाला चांगलीच मोहिनी घातली. अनेक युवकांना आजही हे पुस्तक म्हणजे एक जिवलग मित्र वाटतो. हे पुस्तक चांगलेच लोकप्रिय झाल्याचे यदुनाथजींना त्यांच्याच हयातीत पहायला मिळावे हा एक दुर्मिळ योगायोग. या पुस्तकाच्या यशाने प्रोत्साहित होऊन त्यांनी याच लेखकाच्या लेखनाचा आधार घेऊन 'यशाची वाटचाल' (मूळ पुस्तक : हाऊ टू गेट व्हाट यु वाँट) हे पुस्तक तयार केले. हे पुस्तक म्हणजे तर 'पुढे व्हा'च्या पुढचे पाऊल असेच म्हणावे लागेल. या पुस्तकातील हसत खेळत जगा, इच्छा-सिद्ध व्हा, निराशेशी मुकाबला, अखंड सावधान रे, आशाचे अमृत रसायन, समृद्धीची वाट अशी नुसती प्रकरणांची नावे जरी वाचली तरीही या वितारातील प्रेरकता जाणवत राहते. यातील मूळ साहित्यिकाच्या विचारांना यदुनाथजींनी स्वत:च्या अनुभवाच्या मुशीत घालून ते विचार अधिक सुस्पष्ट व मर्मग्रही केल्याचे जाणवते. आशावाद, प्रयत्नवाद, वैज्ञानिक दृष्टिकोन ही यदुनाथजींच्या लेखनाची खास वैशिष्ट्ये सांगता येतील.

## प्रतिज्ञेचा व्यापक अर्थ

शालेय अभ्यासक्रमात भारत माझा देश आहे, ही प्रतिज्ञा एका ताला-सूरात म्हणवून घेणे (खरे तर उरकून टाकणे) हा शालेय जीवनाचा एक अविभाज्य भाग म्हणून मानला जातो. पण यांत्रिक पद्धतीने ही प्रतिज्ञा म्हटल्यामुळे त्यातील आत्मा हरवतो आहे हे यदुनाथजींच्या लक्षात आले. यावर उपाय काय? सरकारी फतवा काढून काही आहे या परिस्थितीत फार मोठा बदल होण्याची सुतराम शक्यता नाही. पण यदुनाथजी स्वस्थ बसणाऱ्यांपैकी नव्हते. त्यांनी प्रतिज्ञा नावाचे पुस्तक लिहून प्रतिज्ञेतील प्रत्येक वाक्यावर मुलांशी चर्चा करता करता टीका टिप्पणी केली आहे. हे पुस्तक आजही अनेक शिक्षकांना तसेच शिक्षण तज्ज्ञांनाही पाथेय पुरवणारे आहे.

## आणिबाणीच्या काळातील यदुनाथ

स्वराज्य मिळाल्यानंतर अनेक वर्षांनी माजी पंतप्रधान इंदिरा गांधी यांच्या कारकिर्दीत आणिबाणीच्या नावाखाली पुन्हा एकदा निराळ्याच पारतंत्र्याचे आणि गुलामगिरीचे संकट येऊ घातले. या संकटाची चाहूल लागताच हा देश खडबडून जागा झाला. सर्व बाजूने लेखन स्वातंत्र्याची मुस्कटदाबी होत आहे हे लक्षात येताच यदुनाथजींनी आक्रमक रूप धारण केले व साधना संघर्षाला कधी भीत नाही हे त्यांनी प्रत्यक्ष सिद्ध करून दाखवले. त्यावेळच्या यदुनाथजींचा तो रुद्रावतार पाहिल्यानंतर साने गुरुजींच्या पत्री काव्य संग्रहातील 'आम्ही मांडू निर्भय ठाण' या कवितेची आठवण होते. वृत्तपत्रांचा इतिहास लिहिणाऱ्यांना यदुनाथजींनी साधना साप्ताहिकाच्या निमित्ताने वृत्तपत्र स्वातंत्र्यासाठी

दिलेल्या लढ्याची दखल घ्यावीच लागेल.

**साहित्यिक आणि सामाजिक कार्यकर्ता!**

यदुनाथजींना कोणी साहित्यिक मानोत अगर न मानोत. पण सामाजिक कार्यकर्ता म्हणून त्यांनी केलेले बहुमोल योगदान समाज पुरुषाच्या निरंतर स्मरणात राहील यात काय संशय? यदुनाथजींची खरी ओळख त्यांनी अंगिकारलेल्या सामाजिक कार्याच्या परिचयाशिवाय होणार नाही. सामाजिक कार्यकर्ता हेच त्यांचे आसली रूप. आंतरभारती, राष्ट्रसेवा दल, साने गुरुजी कथामाला, मुस्लिम सत्यशोधक समाज या आणि अशा अनेक संस्थांशी आणि चळवळींशी ते सदैव निगडीत होते. ही विविध स्वरूपाची सामाजिक कार्ये चालविण्यासाठी त्यांनी लेखन किंवा साहित्य निर्मिती याकडे साधन म्हणून पाहिले. मी स्वतः तर त्यांना साहित्यिकापेक्षाही सामाजिक कार्यकर्ता म्हणून अधिक चांगल्या प्रकारे जवळून पाहिलेले आहे. सर्वसमावेशकवृत्ती, मनाची विशालता आणि सामान्यातल्या सामान्य कार्यकर्त्यांबाबत त्यांना वाटत असणारा जिव्हाळा, संघटना चातुर्य हे सारे लक्षात घेता त्यांच्या मृत्युमुळे या संस्था चांगल्या मार्गदर्शकाला मुकल्यामुळे पोरक्या झाल्या आहेत, असेच म्हणावे लागेल. संगीताच्या दृष्टीने त्यांचा आवाज सुरेल नसेलही कदाचित, पण साने गुरुजी कथामालेच्या भाव-जागरण दिंडीचे वेळी त्यांनी समूहाला बरोबर घेऊन सांगितलेल्या हिमांशू कुलकर्णी यांच्या 'पणती जपून ठेवा' या गाण्याची सुरावट आजही कानात घुमते आहे. साने गुरुजींचा वारसा अनेक अर्थांनी त्यांच्या मागून चाळीस-पंचेचाळीस वर्षे इमाने इतबारे चालविणारे यदुनाथजींसारखे आगळे-वेगळे व्यक्तिमत्त्व पुन्हा होणे नाही.

□

डॉ. अनिल गोडबोले
३७९ शनिवार पेठ,
लिमये बिल्डिंग, ४ था मजला,
पुणे ४११ ०३०.

## स्वागत

- ❑ **समई निसूर झाली :** नयनतारा देसाई, पुणे. पृष्ठे २५४
- ❑ **शंभर धागे प्रेमाचे :** भा. ल. महाबळ, पुणे. पृष्ठे २२१
- ❑ **गावकुसाबाहेरी कथा :** शरणकुमार लिंबाळे, पुणे. पृष्ठे १५५
- ❑ **जोहाराच्या ज्वाला :** कृ. पं. देशपांडे, पुणे. पृष्ठे ६४
- ❑ **गोष्टी विनोबांच्या :** दिलीप मानसिंग गरुड, पुणे. पृष्ठे ७६
- ❑ **तीन चमचे प्रोत्साहन :** अनुराधा वैद्य, सुभाष सोळंके, औरंगाबाद. पृष्ठे १७५
- ❑ **दि बिग बॉस :** ह. मो. मराठे, पृष्ठे १७५
- ❑ **शाहू छत्रपती (लोकराजा) :** रमेश जाधव, सुरेश एजन्सी, पृष्ठे ३७६
- ❑ **सलत सूर सनईचा :** निर्मला देशपांडे, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, पृष्ठे ११६



अनुक्रमणिका






# दत्तवरद विठ्ठलकृत महाभारत : एक विवेचक अभ्यास

डॉ. अविनाश आवलगावकर

रामायण आणि महाभारत हे भारतीय संस्कृतीचे आणि परंपरेचे आधारस्तंभ होत. आजही भारतीय मनाला या ग्रंथांचे वेड आहे. भारतातील सर्वच कवींना आणि रसिकांना या महाकाव्यांनी आकर्षित केले असून भारतातील सर्व भाषात विविध कालखंडात, त्याची विविध वाङ्मयीन रूपे प्रकट झालेली दिसून येतात. महाभारतातील एकेका पर्वावर वा निरनिराळ्या कथाभागांवर या कवींनी आपली काव्यनिर्मिती केली आहे. मराठी भाषाही याला अपवाद नाही. संतांपासून तर पंडितांपर्यंत अनेक महत्त्वाच्या कवींचा उल्लेख येथे करता येईल. पैकी काही कवी, वाचकांच्या अभिरूचीचे तथा अभ्यासकांच्या संशोधनाचे विषय झालेत, तर काही अजूनही संशोधकांच्या शोधात आहेत. कवी दत्तवरद विठ्ठल हा असाच सतराव्या शतकातील एक महत्त्वाचा कवी होय. मराठी आणि संस्कृत भाषेतून प्रचंड साहित्यसंपदा निर्माण करणारा हा कवी अभ्यासकांच्या दृष्टीने उपेक्षितच होता. मध्ययुगीन साहित्याच्या संशोधक डॉ. मीरा घांडगे यांनी प्रस्तुत कवीच्या महाभारताचा वाङ्मयीन व ऐतिहासिक दृष्टीने विचार करून या कवीला अभ्यासकांपर्यंत पोचवण्याचे काम केले. या दृष्टीने त्या निश्चितच अभिनंदनास पात्र आहेत.

डॉ. मीरा घांडगे यांनी कवी दत्तवरद विठ्ठलाच्या 'महाभारतातील वनपर्वाचा अभ्यास' या विषयावर एम्. फिल्. पदवीसाठी प्रबंधिका सादर केल्यानंतर याच कवीच्या सबंध महाभारताचा अभ्यास करून त्यांनी पुणे विद्यापीठाची पीएच्. डी. पदवी प्राप्त केली. प्रस्तुत शोधग्रंथ या प्रबंधाचेच सारांश रूप होय. प्रस्तुत ग्रंथ नऊ प्रकरणात विभागला असून 'विठ्ठल नाममुद्रा धारण करणारे कवी' या पहिल्या प्रकरणात लेखिकेने प्रारंभकाळ ते १८५० पर्यंत विठ्ठल या नावाने रचना करणाऱ्या अनेक कवींचा शोध घेतला आहे. त्यातून सत्तर विठ्ठल कवींचा शोध लागला. परंतु या सर्व कवींचे लेखन हे महाभारतासारख्या प्रचंड महाकाव्याला स्पर्श करणारे नाही. दत्तवरद विठ्ठल याच कवीने फक्त महाभारतासारख्या आर्ष महाकाव्याला नवे मराठी रूप देऊन मुक्तेश्वर-मोरोपंत या श्रेष्ठ कवींच्या पंक्तीत बसण्याचा मान मिळविला. दुसऱ्या प्रकरणात दत्तवरद विठ्ठलासंबंधीची उपलब्ध असलेली चरित्रात्मक माहिती आणि त्याच्या एकूण वाङ्मयनिर्मितीचा परिचय करून दिला. प्रकरण तीन ते सहापर्यंत व्यासकृत महाभारत आणि विठ्ठल कवीने त्यावर साधलेली मराठी निर्मिती यांचा अतिशय तपशीलवार शोध डॉ. घांडगेंनी घेतला. मूळ महाभारताचा कवी विठ्ठलाने केलेला संक्षेप-विस्तार याची अतिशय काळजीपूर्वक नोंद त्यांनी केली आहे. दत्तवरद विठ्ठलाच्या महाभारताचे स्वरूपक प्रामुख्याने संक्षेपाचे आहे. आवश्यक तेथे संक्षेप-विस्ताराचे धोरण ठेवून मूळ कथावस्तूला बाध्यता येणार नाही, याची



अनुक्रमणिका

जाणीव ठेवणे, यात कवीच्या कौशल्याचा प्रत्यय येतो. अशा काव्याचा तौलानिक अभ्यास करताना त्यातील सूक्ष्म बदलांची मूळ काव्याच्या पार्श्वभूमीवर नोंद करणे आवश्यक असते.

सहाव्या प्रकरणात मुक्त-मयूरकृत महाभारतातील कवी विठ्ठलाच्या महाभारताचा तुलनात्मक अभ्यास डॉ. घांडगेंनी केला आहे. हे तीनही कवी समकालीन असल्याने या दृष्टीने विचार करणे आवश्यक होते. मुक्तेश्वराचे कलाकवी म्हणून असलेले स्थान, तथा मोरोपंताचे संस्कृत प्राचुर्य आणि वाङ्मयीन गुण कौशल्यामुळे हे कवी, विठ्ठलकवीच्या तुलनेने अधिक श्रेष्ठ ठरतात, याची जाणीवही डॉ. घांडगेंनी करून दिली आहे. संशोधनाला अधिक वास्तवदर्शी ठेवण्याचा हा प्रयत्न लक्षात घेण्यासारखा आहे. मूळ महाभारताच्या वाङ्मयीन मूल्यांचा विचार करता कवी विठ्ठलाची ही रचना फिकी वाटते. परंतु मुक्त-मयूरांच्या तुलनेत काही ठिकाणी कवी विठ्ठलाची रचना अधिक सरस असल्याचे लक्षात येते. शिवाय त्याच्या मनातील उत्कट कृष्णभक्तीचा आविष्कार म्हणूनही या काव्याचे मूल्य लक्षात घेण्यासारखे आहे. विठ्ठलाचे महाभारत कथानकप्रधान असले तरी अनेक कथांना एकत्रित आणून त्याची वाङ्मयीन गुणवत्ता टिकवण्याचे काम त्याने केले आहे. प्रसंगातील नाट्यमयता, कल्पनाविलास, रसाविष्कार, छंदरचना, अलंकारविलास, व्यक्तिचित्रणे, तसेच प्रस्तुत काव्यातून घडणारे समाजदर्शन या सर्व वाङ्मयीन गुणांचा डॉ. घांडगेंनी वस्तुनिष्ठपणे शोध घेतला. समाजातील बहुसंख्य लोक संस्कृतपासून वंचित असल्याने महाभारतासारख्या संस्कृत महाकाव्याला कवी विठ्ठलाने मराठी रूप दिले. आपण मुद्दाम मराठी भाषेतून काव्यनिर्मिती करीत आहोत, याची जाणीवपूर्वक नोंदही त्याने केली आहे. सहासष्ट हजार ओव्यांइतकी प्रचंड साहित्यनिर्मिती असलेला हा कवी आजवर उपेक्षित राहावा, याचे सखेद आश्चर्य वाटते. डॉ. घांडगेंनी या दुर्लक्षित कवीवर संशोधन करून फार मोलाचे कार्य केले आहे. परिशिष्टात दत्तवरद विठ्ठल, मुक्तेश्वर आणि मोरोपंत यांच्या काव्याचा व्यासकृत महाभारताशी एक तौलनिक आलेखही त्यांनी जोडला आहे. तसेच कवी विठ्ठलाच्या ग्रंथसंपदेची सूची जोडून संशोधनाच्या आवश्यक त्या बाबींची पूर्तता केलेली आहे. तरीही अभ्यासाच्या दृष्टीने काही प्रश्न निर्माण होतातच. उदा. विठ्ठल कवीचे नाव दत्तवरद विठ्ठल कसे? याविषयीची चर्चा प्रारंभीच अपेक्षित होती. तसेच प्रस्तुत कवीचा पत्रव्यवहार अभ्यासताना पृ. १६ वर श्रीमंत तात्यांना लिहिलेले पत्र दिले आहे. हे तात्या कोण याचा शोध घेणे गरजेचे वाटते. मुद्रिते नीट न तपासल्याने अनेक संदर्भ चुकीचे असल्याचे आढळतात. (उदा. पृष्ठ क्र. ३, ५, ९, ५०, ९१ इत्यादी) पहिल्या प्रकरणानंतर दिलेल्या संदर्भ-टीपांचे क्रमांक प्रकरणात कोठेच आढळत नाहीत. तर काही ठिकाणी संदर्भ-टीपा व्यवस्थित दिलेल्या नाहीत. (उदा. पृ. क्र. १०, १८, १७५). या अभ्यासाकडे केवळ संक्षेप-विस्तारापुरतेच मर्यादित भूमिकेतून न पाहता त्याला अधिक सखोल चिंतनाची डूब देता आली तर यातून सतराव्या शतकातील अभ्यासाच्या काही नवीन दिशा स्पष्ट होऊ शकतील. यादृष्टीने



अनुक्रमणिका







अभ्यास करण्याची आज आवश्यकता आहे. प्रस्तुतचा ग्रंथ म्हणजे डॉ. मीरा घांडगे यांनी यादृष्टीने टाकलेले एक पाऊल म्हणावे लागेल. त्यांच्याकडून अधिक चिंतनपर संशोधनाची अपेक्षा करायला हरकत नाही.

डॉ. अविनाश आवलगावकर
मराठी विभाग, पुणे विद्यापीठ, पुणे ७.

□

दत्तवरद विठ्ठल विरचित महाभारत (वाङ्मयीन व ऐतिहासिक मूल्य)
डॉ. मीरा घांडगे
अक्षय प्रकाशन, २५०/११, शनिवार पेठ, पुणे ३०, पृष्ठे २५२, मूल्य रु. २००

□

---

## स्वागत

- ❑ **जयभारत जननी :** गोविंद केळकर, बेळगांव.
- ❑ **पैगाम :** विश्वास वसेकर, प्रतिमा प्रकाशन, पुणे. पृष्ठे ७७
- ❑ **जावे जन्माकडे :** अरुणा ढेरे, सुरेश एजन्सी, पुणे. पृष्ठे १०४
- ❑ **तिची स्वप्ने :** संपा.चंद्रकांत पाटील, विष्णू खरे, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई. पृष्ठे १५४
- ❑ **वगनाट्ये :** भास्कर जाधव, प्रकाशक — कमल जाधव, अहमदनगर. पृष्ठे ९४
- ❑ **अष्टपैलू आचार्य अत्रे :** माधव गडकरी, श्री विद्या प्रकाशन, पुणे. पृष्ठे ७२
- ❑ **महाराष्ट्र साहित्य परिषद :** म. श्री. दीक्षित, राज्य मराठी वि. संस्था, पृष्ठे ११४
- ❑ **ऋतुलाघव :** कल्याण इनामदार, सूर्यकान्त दापेकर, औरंगाबाद. पृष्ठे ७२
- ❑ **गोदा :** सुधाकर रिठे, प्रकाशिका — विद्या नाले, ठाणे. पृष्ठे ५८
- ❑ **तळे संध्याकाळचे :** श्रीधर शनवारे, प्रकाशिका — शैलेश देशपांडे, नागपूर. पृष्ठे १०८
- ❑ **भाई अलीची जंगलकथा :** लीला पाटील, पृष्ठे ४२
- ❑ **घरकोंबडा :** अश्विनी घोंगडे, पुणे. पृष्ठे ३२
- ❑ **बिलंदर बारिकराव आणि इतर कथा :** अश्विनी घोंगडे, पुणे. पृष्ठे ३२
- ❑ **गोष्टीरूप १०१ म्हणी :** योगेश्वर अभ्यंकर, नाशिक. पृष्ठे १३३
- ❑ **श्याम कवित :** उमाकांत कीर, कृष्णा करवार, मुंबई. पृष्ठे ८४
- ❑ **मी जिवंत आहे :** अशोक व्हटकर, पुणे. पृष्ठे १०२
- ❑ **वर्तमान :** अश्विनी धोंगडे, पुणे. पृष्ठे ११२
- ❑ **आचार्य अत्र्यांची चित्रगीते :** गंगाधर महांबरे, पुणे. पृष्ठे १२४
- ❑ **दलित ब्राह्मण :** शरणकुमार लिंबाळे, पृष्ठे १८१
- ❑ **बुवा उवाच :** वि. आ. बुवा, कल्याण. पृष्ठे १२८



अनुक्रमणिका






# नेटके संपादन, सहृदय मूल्यमापन

डॉ. गं. ना जोगळेकर

श्री. श्री. पु. गोखले हे सार्वजनिक संस्थांमधील कार्यकर्ते, म्हणून विशेष प्रसिद्ध आहेत. 'टिळक स्मारक मंदिर ट्रस्ट', 'वक्तृत्वोत्तेजक सभा' (आणि यातर्फे चालणारी वसंत-व्याख्यानमाला) यांच्याशी त्यांचा दीर्घकाळचा संबंध आहे. स्वा. सावरकरांचे अनुयायी असलेल्या श्री. श्री. पु. गोखले यांचा, दादर येथील सावरकर-स्मारकाच्या उभारणीत महत्त्वाचा वाटा आहे. मुळात विज्ञानाचे विद्यार्थी असलेल्या श्री. गोखले यांना साहित्य, राजकारण, समाजकारण, इतिहास, संस्कृती या विषयांचेही तितकेच आकर्षण असून त्यांनी वेळोवेळी प्रासंगिक स्वरूपाचे लेखन केले आहे. 'विष्णुबुवा ब्रह्मचारी आणि त्यांचे विचारधन' या संपादित ग्रंथामुळे श्री. श्री. पु. गोखले यांच्या अभ्यासू वृत्तीचे नेटके दर्शन घडते.

'विष्णुबुवा ब्रह्मचारी' म्हणजे मूळचे विष्णु भिकाजी गोखले. एकोणिसाव्या शतकात गाजलेले एक विलक्षण व्यक्तिमत्त्व. इंग्रजी राजवटीत आपल्या अवनत स्थितीची विदारक जाणीव झालेल्या पहिल्या पिढीचे ते प्रतिनिधी होते. आपल्या घराण्याची कीर्ती दिंगत पसरविणाऱ्या थोर पूर्वजाबद्दल वाटणाऱ्या अभिमानापोटी हे संपादन करावे असे श्री. पु. गोखले यांना वाटले असणे शक्य आहे. पण आपल्या असामान्य विद्वत्तेमुळे आणि द्रष्टेपणामुळे ज्याने सतत भविष्यकाळाचा वेध घेतला त्या महापुरुषाचे स्मरण नवीन पिढ्यांनीही सतत ठेवले पाहिजे या तळमळीमुळे ते या संपादनाकडे वळले असावेत.

एकोणिसाव्या शतकातील ग्रंथकारासंबंधीचे संशोधन वस्तुतः फारसे कठीण ठरू नये. पण आपल्याकडे संशोधनाची साधने थोडक्या काळात इतकी दुर्मिळ होतात की, संशोधकाची दमछाक झाल्याशिवाय राहात नाही. एकोणिसाव्या शतकातील ग्रंथ, नियतकालिके, शासकीय वृत्तांत आणि राजपत्रे मुळातून पाहिल्याशिवाय संशोधकाचे समाधान होत नाही. एखादा किरकोळ तपशील निश्चित करण्यासाठीही त्याला बरीच मेहनत करावी लागते. सुदैवाने श्री. पु. गोखले यांनी प्रयत्नात काही कसूर केलेली नाही, याची प्रचीती हे पुस्तक वाचताना येते.

'विष्णुबुवा (वस्तुतः 'विष्णुबोवा' हे नाव प्रचारात होते) आणि त्यांचे विचारधन' या शीर्षकातूनच या पुस्तकाचे दोन भाग सूचित झाले आहेत. रुढ अर्थाने ज्यांचे फारसे शिक्षण झाले नव्हते त्या विष्णुबुवांनी स्वाध्यायपद्धतीने अखंड ज्ञानसाधना केली. वेदांवर त्यांची अपार निष्ठा होती. पण भूतकाळाला चिकटून न राहता नव्या काळाच्या संदर्भातच वेदविद्येचा लाभ करून घेतला पाहिजे, अशी त्यांची धारणा होती. या अखंड चिंतनातून 'वेदोक्त धर्मप्रकाश' या वृहत्-ग्रंथाची त्यांनी निर्मिती केली. ज्या काळात विष्णुबुवा समाजाचे



अनुक्रमणिका






निरीक्षण करीत होते, त्या काळात इंग्रजांच्या सत्तेमुळेच नव्हे तर ख्रिस्ती धर्माच्या प्रसारामुळेही शिक्षितवर्ग भांबावला होता. सर्व आयुष्य धर्मप्रसारासाठी वाहणारे 'मिशनरी' जमेल त्या पद्धतीने भारतीयांचा बुद्धिभेद करीत होते. १८४२ पासून प्रकाशित झालेल्या 'ज्ञानोदय'चे तर हेच उद्दिष्ट होते. या ख्रिस्ती मताला तितक्याच समर्थपणे वैचारिक पातळीवर उत्तर द्यायचे विष्णुबोवांनी ठरविले. त्या प्रेरणेतूनच त्यांनी 'वेदोक्त धर्मप्रकाशा'सारखे ग्रंथ लिहिले आणि 'समुद्र किनाऱ्यावरची व्याख्याने'ही दिली. श्री. पु. गोखले यांनी संपादित केलेल्या या पुस्तकात विष्णुबोवांच्या विविध ग्रंथांतले निवडक उतारे दिले आहेत. त्यावरून या लोकविलक्षण समाजसेवकाची वैचारिक झेप किती मोठी होती, याची कल्पना येऊ शकते. विष्णुबोवांना वेद प्रमाण आहेत, पण अंधश्रद्धा आणि कालबाह्य रुढी मान्य नाहीत. पुनर्विवाहास त्यांची मान्यता आहे आणि 'सोवळे म्हणजे स्वच्छता' असे ते म्हणतात. भगवद्गीतेतील वचनांचा त्यांनी सतत आधार घेतला आहे. ज्या काळात वेदांचा आधार घेऊन स्वार्थी व ढोंगी कर्मठांनी बंड माजविले होते, त्याच काळात एकीकडे अशा दांभिकांचा समाचार घेत दुसरीकडे ख्रिस्ती दुहेरी कार्य ऐतिहासिक महत्त्वाचे ठरते. भेदभावविरहित सदाचरण, परोपकार व व्यसनमुक्त समाजरचना हीच वेदाची मुख्य शिकवण आहे, असे विष्णुबोवांचे प्रतिपादन आहे.

'वेदोक्त धर्मप्रकाश' ग्रंथामधून विष्णुबोवांच्या पांडित्याची कल्पना येते तर 'सुखदायक राज्यप्रकरणी निबंध' या आटोपशीर रचनेमधून त्यांच्या द्रष्टेपणाची आणि प्रतिभासामर्थ्याची प्रचीती येते. भारतीय समाजाची दयनीय स्थिती आणि अठराविश्वे दारिद्र्य विष्णुबोवा अनुभवीतच होते. शोषणमुक्त समाज, सर्वांचे सर्वांसाठी या तत्त्वावर आधारलेले सामूहिक जीवन, व्यक्तीची आणि शासनाची कर्तव्ये यासंबंधी या लहानशा निबंधात इतक्या क्रांतिकारक कल्पना त्यांनी मांडल्या आहेत की त्यांच्या द्रष्टेपणाचे आश्चर्य वाटल्याशिवाय राहात नाही. समाजजीवनाच्या दु:खाचे मूळ व्यक्तिगत स्वार्थ, स्वत:साठी केलेला संपत्तीचा संग्रह यात आहे. त्यामुळे नवीन समाजरचनेत या आप-पर भावाचे उच्चाटन केले पाहिजे असे विष्णुबोवांना वाटते. शेते सर्वांच्या म्हणजे गावाच्या मालकीची, त्यावर सर्वांनी कष्ट करून धान्य पिकवायचे, उत्पन्न गावाच्या मालकीचे, पाच वर्षांवरच्या मुलांच्या संगोपनाची जबाबदारी शासनाची, गरजेनुसार मुलांना त्या त्या विद्येत पारंगत करायचे अशा विलक्षण कल्पना विष्णुबोवांनी मांडल्या आहेत. १८६७ मध्ये हा निबंध विष्णुबोवांनी लिहिला. त्याचे इंग्रजीत भाषांतर करून इंग्लंडमधील पार्लमेंटच्या सभासदांना पाठविला. योगायोग असा की, याच सुमारास मार्क्सचा सुप्रसिद्ध 'भांडवल' (कॅपिटल) हा ग्रंथ प्रकाशित झाला. मालक आणि मजूर यांच्यातील संघर्षावर मार्क्सवाद आधारलेला आहे, तर विष्णुबोवांची विचारसरणी 'सहनाववतु सहनौ भुनक्तु' या प्रार्थनेवर आधारलेली आहे ! याच निबंधाबरोबरीच्या 'राजनीती' प्रकरणातूनही विष्णुबोवांचे वेगळेपण प्रकट होते. 'हकीकत' या शीर्षकाने आपले काही प्रमाणात आत्मकथन विष्णुबोवांनी केले होते. ते

अपूर्णच राहिले. पण १९ व्या शतकातील प्रसिद्ध व्याकरणकार व सुधारणावादी दादोवा पांडुरंग यांना त्यापासून आत्मचरित्रलेखनाची प्रेरणा मिळाली. 'समुद्र किनारीचा वादविवाद' मधून विष्णुबोवांचे युक्तिवादकौशल्य व स्वधर्माभिमान यांवर प्रकाश पडतो. एकंदरीने श्री. पु. गोखले यांच्या या संपादित पुस्तकामुळे विष्णुबोवांचे विचारधन नव्या पिढीपर्यंत पोचविण्याचे उद्दिष्ट निश्चितच साध्य होईल.

श्री. पु. गोखले यांनी ज्या भागास 'चरित्र' असे म्हटले आहे, त्यात केवळ विष्णुबोवांचे लौकिक चरित्र नाही तर त्यात १९ व्या शतकातील सत्तांतर, इंग्रजी राजवटीच्या प्रारंभकालातील घटना, इंग्रजांचा कावेबाजपणा, खिस्ती धर्मीयांचे धर्मप्रसाराचे उद्योग, त्याचा सुशिक्षित वर्गावर होणारा परिणाम, मुंबईतील बहुढंगी संस्कृतीचे वेगळेपण, विष्णुबोवांनी मुंबई हेच आपल्या कार्याचे ठिकाण निवडण्यातील सहेतुकता, विष्णुबोवांची ज्ञानसाधना, त्यांच्या लौकिक जीवनातील काही चढउतार, त्यांचे ठिकठिकाणचे भ्रमण, ईश्वर आणि ग्रंथ यांनाच गुरू मानण्याचा व स्वधर्मप्रसारार्थ ब्रह्मचर्यव्रताचे जीवन व्यतीत करण्याचा निश्चय या सर्वांचे थोडक्यात विवेचन समर्पक शब्दांत श्री. गोखले यांनी केले आहे. 'पहिला हिंदू मिशनरी' असा त्यांचा यथार्थ गौरव करतानाच विष्णुबोवांच्या विचारांमधील काही त्रुटींकडेही श्री. गोखले यांनी वाचकांचे लक्ष वेधले आहे. विष्णुबोवा त्यांच्या काळात अनेकांच्या टीकेचा विषय का झाले आणि इतके असामान्यत्व असूनही त्यांची उपेक्षा का झाली, याचीही चर्चा श्री. पु. गोखले यांनी केली असल्याने त्यांच्या विवेचनाला समतोलपणा प्राप्त झाला आहे. एकंदरीने या संपादनाच्या रूपाने श्री. पु. गोखले यांनी आपल्या घराण्यातील पूर्वजाचे उचित स्मरण केले आहे, यात शंका नाही.

ग. ना. जोगळेकर
मनीषा सोसायटी, कर्वेनगर, पुणे ५२.

□

'विष्णुबुवा ब्रह्मचारी आणि त्यांचे विचारधन'
संपादक - श्री. पु. गोखले
'नवकमल प्रकाशन' पुणे ४११ ००२.

---

## स्वागत

- ❑ **आवर्तन :** सानिया, मौज प्रकाशन, मुंबई
- ❑ **तुती लागवड :** धानोरकर, जावळे
- ❑ **रेशीम कीटक संगोपन :** धानोरकर, जावळे, पृष्ठे १९.
- ❑ **मधुमक्षिका पालन :** कुलकर्णी-धानोरकर पृष्ठे २५४
- ❑ **फळांचे काढणीनंतरचे तंत्रज्ञान :** दत्तप्रसाद वासकर, मनोहर प्रकाशन, अहमदनगर.
- ❑ **साहित्य विवेक :** म.द.हातकणंगलेकर, प्रतिमा प्रकाशन, पुणे. पृष्ठे २५४
- ❑ **फुलवेल :** इंदिरा संत, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई. पृष्ठे २६०
- ❑ **काळजी :** ज्योत्स्ना देवधर, पुणे. पृष्ठे १९२

# वैदिक धर्माचे विश्वकल्याणकारी स्वरूप

डॉ. मु. श्री. कानडे

मराठी साहित्य समीक्षेच्या क्षेत्रात समतोल टीकादृष्टी असणारे ज्येष्ठ समीक्षक म्हणून डॉ. व. दि. कुलकर्णी यांचे नाव सर्वपरिचित आहे. ते आपल्या पूर्वायुष्यात प्रामुख्याने अर्वाचीन साहित्याचे मर्मज्ञ टीकाकर म्हणून प्रसिद्धी पावले होते. आजही त्यांचा अर्वाचीन साहित्याचा अभ्यास चालू आहे, तथापि गेली अनेक वर्षे त्यांनी संत साहित्याच्या आणि त्यातही विशेष करून संत ज्ञानदेवांच्या वाङ्मयाच्या परिशीलनातच आपले लक्ष प्रामुख्याने केंद्रित केलेले आहे. मध्ययुगातील ज्ञानदेवादी संतापासून आजच्या काळातील अधिकारसंपन्न अशा भाष्यकारांच्या विचारांचे अध्ययन करण्यात डॉ. व. दि. कुलकर्णी रंगलेले आहेत. पारमार्थिक विचार हेच जीवन उजळून टाकणारे असतात, त्या विचारांनीच मनाला शांती प्राप्त होते, अशी त्यांची धारणा आहे.

'धर्मदर्शन' या त्यांच्या नवीन पुस्तकाचे त्यांनीच 'प. पू. सद्‌गुरू श्रीरामकृष्ण क्षीरसागरमहाराज यांच्या दैवी वाणीतून प्रकटलेले धर्मदर्शन' असे सूत्रमय वर्णन केलेले आहे. क्षीरसागरमहाराज हे नगर येथे वास्तव्य करून असलेले एक थोर दत्तसांप्रदायिक सत्पुरुष आहेत. त्यांनी आपल्या भक्तांशी वेळोवेळी जो धर्म-संवाद केला, त्याच्या आधारावर डॉ. व. दि. कुलकर्णी यांनी धर्म-दर्शन या पुस्तकाची मांडणी केली आहे. आपण या थोर महात्म्याच्या विचारांचेच संकलन करीत आहोत, अशी नम्र भूमिका घेऊन डॉ. व. दि. कुलकर्णी यांनी मुखपृष्ठावर वा अन्यत्र लेखक म्हणून आपले नाव छापलेले नाही.

'धर्मदर्शन' हे सर्वसामान्य धर्मविषयक मूलतत्त्वांची चर्चा करणारे पुस्तक नाही. वैदिक धर्माचे तात्त्विक व आचारविषयक स्वरूप समजावून सांगणे हे या लेखनामागील उद्दिष्ट आहे. स्वत: डॉ. कुलकर्णी यांनी प्रस्तावनेत म्हटल्याप्रमाणे "वैदिक सनातन धर्मासंबंधीच्या रूढ विपरीत समजुती आणि चुकीचे ग्रह दूर करणारे हे 'धर्मदर्शन' आहे... आपण आपल्या कर्तव्यकर्मासाठी तन-मन-प्राणांनिशी झटावं, हीच मूळ धर्माज्ञा आहे. हे या 'धर्मदर्शना'मध्ये सुस्पष्ट केलेलं आहे."

कोणत्याही धर्माचे स्वरूप समजावून घेताना त्या धर्मातील ज्ञानी पुरुषांनी मांडलेला जीव-जगत् व जगदीश यांचा संबंध, त्या धर्माने सांगितलेला नीतिविचार आणि नित्य आचारांचे कर्मकांड अशा तीन दृष्टींनी करावा लागतो. डॉ. व. दि. कुलकर्णी यांच्या पुस्तकातील धर्मदर्शन हे धर्मसंस्थापना, वर्णाश्रम-धर्म-विचार, धर्मसाधना आणि 'मुक्ती'वरील भक्ती अशा चार प्रकरणातून वैदिक धर्माचे विवरण करताना डॉ. कुलकर्णी यांनी संस्कृत ग्रंथातील अवतरणे आणि ज्ञानदेवादी संतांची वचने यांचे यथोचित आधार देऊन आपली भूमिका वाचकांना पटवून देण्याची दृष्टी ठेवलेली आहे. त्यामुळे

'धर्मदर्शन' पुस्तक म्हणजे केवळ क्षीरसागरमहाराजांच्या विचारांचे संकलन असे न होता ते विचारांवर चिंतनपर व अभ्यासपूर्वक केलेले एक भाष्यच वाचल्याचा प्रत्यय येतो.

समाजाचे धारण करणारा आणि अभ्युदय व निश्रेयस ह्या दोहोंनाही सामावून घेणारा तो धर्म. या धर्माची वैचारिक बैठक कायम राहण्यासाठी प्रत्येक काळात 'धर्मपुरुष' निर्माण होतात. आपण त्यांचा अवतार, ऋषी, संत, आचार्य अशा वेगवेगळ्या नावांनी निर्देश करतो. पण 'धर्मस्थापना' हेच त्यांच्या जीवनकार्याचे उद्दिष्ट असते. यांचा परामर्श पहिल्या प्रकरणात घेतल्यावर चातुर्वर्ण्यामागील भूमिका, चार आश्रम, यज्ञसंकल्पना यांचा ऊहापोह दुसऱ्या प्रकरणात आहे. चार आश्रमामध्ये गृहस्थाश्रमाचे महत्त्व कसे आहे आणि गृहस्थाश्रम हा धर्मजीवनाचा मूलाधार कसा आहे, हे त्या प्रकरणात विशद केले आहे. या गृहस्थाश्रमातील कुळधर्म कुळाचारांचे परिपालन करतानाच धर्मसाधना होत असते. पण त्यासाठी सद्गुरूंची प्राप्ती होणे आणि त्यांच्याकडून नामस्मरणाची दीक्षा मिळवण्याची पात्रता मिळवावी लागते. मुक्ती आणि भक्ती यांचा मेळ मराठी संतांनी कसा घातलेला आहे, त्यांच्या वचनांचा मागोवा घेत ज्ञानदेवांच्या पसायदानात संपूर्ण धर्मदर्शन कसे अनुभवता येते, ते सांगून डॉ. व. दि. कुलकर्णी यांनी आपल्या विवेचनाचा समारोप केला आहे.

'धर्म' या संकल्पनेचीच हेटाळणी करणारा एक वर्ग आणि धर्मातील कर्मकांडाचे आंधळेपणाने आचरण करणारा दुसरा वर्ग या दोघांच्याही समोर खऱ्या धर्मविचारांचे यथार्थदर्शन घडविणे अवश्यक होते आणि डॉ. कुलकर्णी यांनी ते आपल्या विचारप्रवर्तक व सुबोध भाषेत केलेले आहे. डॉ. व. दि. कुलकर्णी क्षीरसागरमहाराजांचे निष्ठावंत शिष्य असले तरी त्यांच्या शैलीत पूर्वीपासूनच निराग्रही वृत्ती असल्याने धर्मविषयक विविध अंगांचे महत्त्व व आजच्या काळातही असणारी त्याची आवश्यकता यामुळे त्यांच्या प्रतिपादनविषयी तीव्र स्वरूपाचे मतभेद होतील, असे वाटत नाही.

तथापि त्यांच्या काही विधानांबाबत थोडीशी चर्चा करावी असे वाटते. पृ. ९९ वर त्यांनी रामायणातील सीताहरणाबाबत खुद्द सीतेचे एक वचन उदधृत केले आहे. सीता श्रीरामाला म्हणते, 'रावणाला मारणं इतकं सोपं नाही. तो मायावी असल्यामुळे त्याला मारणं अवघड आहे. तर, तो मला पळवून नेईल. त्याची शक्ती कमी होईल. मग तुम्हाला त्याला मारता येईल. म्हणून जरी रावणानं माझं अपहरण केलं तरी ते पाप मानू नका.' हे कोणत्या रामायणातून घेतले आहे, त्याचा संदर्भ तेथे नाही. वास्तविक सीताहरणापूर्वी रावणाने इतकी दुष्कृत्ये केली होती, की त्याच्या पापाचा घडा भरण्यासाठी आणखी सीताहरणाचे एक पाप त्याच्या हातून होण्याची जरूरीच नव्हती.

'हिरण्यकश्यपू, रावण, कंस, शिशुपाल इत्यादी दुरात्मे अंत:काळी भक्तावस्थेत आले असे मानावयास हरकत नाही.' असं मत डॉ. कुलकर्णी यांनी पृ. ८४ वर नोंदविले आहे. त्यांच्याशी सहमत होणे कठीण आहे. वरील सर्वांना अवतारी पुरुषाकडून मृत्यू आला, पण त्यावेळीही त्यांच्या अंत:करणातील पराकोटीला गेलेला दुष्टपणा नाहीसा झालेला होता, असे कोठेही लिहिलेले नाही.



अनुक्रमणिका







नामदेव-तुकाराम यांच्यासारख्या संतांनी परमेश्वराच्या भेटीसाठी अत्यंत आर्त शब्दांनी त्याला आळविले होते. आपली उत्कट तळमळ त्याला भावकोमल शब्दांनी ऐकविली होती आणि त्यांच्या अंत:करणातील ही भेटीची अनिवार उत्सुकता परिसीमेला गेल्यावर त्यांना विठ्ठलाच्या पावन दर्शनाचा परमानंद मिळाला. डॉ. व. दि. कुलकर्णी यांनी या संदर्भात काहीशी न पटणारी भूमिका मांडली आहे. ते म्हणतात, 'तुकारामांना आधी ईश्वराची प्राप्ती झाली, नंतर तपश्चर्या झाली. तसंच ज्ञानेश्वरांबाबत घडलेलं आहे.' (पृ. ६६) ज्ञानेश्वरांच्या संदर्भात 'बालपणीच सर्वज्ञता वरी तयाते' अशी स्थिती होती. इतर संत मंडळी मात्र नामस्मरणाच्या मार्गावरून दीर्घकाळ वाटचाल केल्यानंतरच विठ्ठलदर्शनाने कृतार्थ झाली. समर्थ रामदासांच्या करुणाष्टकातील रामाची आळवणी ही आधी तपश्चर्या आणि नंतर श्रीरामदर्शन हाच मार्ग अनुसरणारी आहे.

'मधुराभक्ती ही सर्वात श्रेष्ठ आहे' हे डॉ. कुलकर्णी यांचे मतही तपासून घेतले पाहिजे. आपले संत आपल्या उपास्यदैवताला, मग तो विठ्ठल असो, दत्तात्रेय असो की श्रीराम असो, आपला सखा मानतात, त्याला भेटण्यासाठी टाहो फोडतात, त्याने दर्शन दिले नाही तर दु:खी-कष्टी होऊन त्याच्यावर रागावतात आणि शेवटी माउली म्हणून त्याच्या पायावर लोटांगण घालतात. मधुराभक्तीचा आविष्कार करणाऱ्या गौळणी व विराण्या संतांनी लिहिल्या आहेत, (ज्ञानदेवही अशा लेखनात रमलेले आहेत) परंतु या विराण्यात बाह्यात्कारी का होईना वैषयिक वर्णनांची वैठक आहे, त्यामुळे ती भक्ती श्रेष्ठ आहे असा निष्कर्ष काढणे उचित वाटत नाही. संतांच्या मनात सख्यभक्तीला सर्वाधिक स्थान आहे. त्यामानाने मधुराभक्ती व्यक्त करणाऱ्या अभंगांची संख्या फार मर्यादित आहे. ही वस्तुस्थितीही ध्यानात ठेवली पाहिजे.

संतसाहित्याचा एक विद्यार्थी या नात्यानेच डॉ. कुलकर्णी यांच्या पुस्तकातील काही विधानांबाबत थोडा वेगळा दृष्टिकोन अभ्यासकांसमोर ठेवला आहे.

डॉ. व. दि. कुलकर्णी पारमार्थिक जीवनाची अनेक वर्षे निष्ठेने वाटचाल करणारे अधिकारी अभ्यासक आहेत. आपले नैतिक जीवन दिवसेंदिवस अवनतीकडे चालले आहे. अशा वेळी आपल्या ज्ञानमय-प्रेममूलक अशा विश्वकल्याणकारी धर्माचे खरेखुरे स्वरूप दाखवून देऊन डॉ. कुलकर्णी यांनी एक महत्त्वाचे सामाजिक कार्य केले आहे. त्यावद्दल त्यांना मनापासून धन्यवाद देणे अवश्य आहे.

□

डॉ. मु. श्री. कानडे
'शंकरछाया', शनिवार पेठ,
पुणे ४११ ०३०.

□

धर्मदर्शन : डॉ. व. दि. कुलकर्णी
प्रकाशक : अ. वा. परांजपे
'मेघदूत' १६२, टायकलवाडी मार्ग,
माहीम,
मुंबई ४११ ०१६.



अनुक्रमणिका

# केवलाल्हादवादी मनोधर्मातून सिद्ध झालेली समीक्षा

डॉ. हे. वि. इनामदार

अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळाचा वर्धापन समारंभ पुण्यातील महाराष्ट्र साहित्य परिषदेने; परिषदेच्या सभागृहात दि. ७ आणि ८ मार्च १९९८ अशा दोन दिवसांत आयोजित केला होता. या समारंभात डॉ. व. दि. कुलकर्णी यांचे अध्यक्षीय भाषण झाले. या भाषणाची डेमी तेवीस पानी संहिता परिषदेने छापून घेऊन प्रसृत केली आहे.

साहित्य कलेविषयी उत्कट प्रेमभाव बाळगणाऱ्या आणि या प्रेमभावात रंगत जाणाऱ्या 'केवलाल्हादवादी' समीक्षकाचे मुक्त चिंतन, असे या भाषणाचे स्वरूप आहे. 'तुका म्हणे होय मनाशी संवाद । आपुलाचि वाद आपणासी' असे हे प्रकट चिंतन आहे. या अक्षरांकित चिंतनाची पातळी फार फार वरची आहे. श्रोत्याने/वाचकाने अंतर्मुख होऊन स्वत:च्या वाङ्मयीन भूमिकेचा पुनर्विचार करावा, अशी प्रेरणा देण्याचे बळ या लेखकात आहे. (भाषणाची लिखित संहिता समोर असल्यामुळे इथून पुढे 'लेखक' असा उल्लेख, केवळ एक सोय म्हणून केला आहे.)

या भाषण संहितेचे स्थूल मानाने तीन भाग कल्पिता येतात. एक समीक्षक म्हणून झालेली लेखकाची जडण-घडण, लेखकाचा स्वत:चा वाङ्मयीन दृष्टिकोन आणि मातृभाषा मराठीचे भवितव्य अशा तीन मुद्द्यांना अनुलक्षून लेखकाच्या विचारदर्शनाची ओळख करून घेता येते. लेखकाच्या भाषाविलासाची बलस्थाने आणि अबलस्थाने या आणखी एका छोट्या मुद्याची जोड देऊन हे टिपण पुरे करता येईल.

**समीक्षावृत्तीचा विकास**

रा. श्री. जोग, श्री. के. क्षीरसागर, ग. त्र्यं. देशपांडे, पु. शि. रेगे, दि. के. बेडेकर, गंगाधर पाटील, प्रभाकर पाध्ये आणि द. ग. गोडसे या आठ विचारवंतांचा स्वत:च्या साहित्यविषयक चिंतनावर कमी-अधिक प्रभाव पडल्याचे लेखकाने क्रमश: विशद केले आहे. जोगांच्या साहित्यविचारात संस्कृत काव्यशास्त्राला प्राधान्य आहे. त्यांची समीक्षा रूपवादी, रसिकलक्षी व विदग्ध आस्वादक स्वरूपाची आहे. 'अनन्य साधारण साहित्यनिष्ठा असलेले पहिले विद्याक्षेत्रीय साहित्य विमर्शक' म्हणून जोगांची प्रतिमा लेखकाच्या डोळ्यांपुढे आहे.

श्री. के. क्षीरसागर हे थेट पाश्चात्य साहित्य विचारांना भिडणारे टीकाकार होत. साहित्यवृत्तीतून साहित्यिकाच्या मनापर्यंतचा प्रवास व त्यातून पुढे उमटणारा अनंतत्वाचा ध्वनी ते अनुभवतात आणि तज्जन्य आनंदानुभूतीत मग्न होतात. साहित्येतर प्रांतातील श्रेष्ठींनी साहित्यक्षेत्रावर केलेली आक्रमणे ते चालवून घेत नाहीत. साहित्याच्या अक्षर मूलतत्त्वांचे शास्त्र उभारण्यावर क्षीरसागरांनी भर दिला आहे.

ग. त्र्यं. देशपांडे हे भारतीय साहित्यशास्त्र कसे उत्क्रांत होत गेले, हे इतिहासमुखाने










दाखवितात. तसेच आपल्या साहित्यशास्त्रातील संज्ञा आणि संकल्पना मूळ अध्यात्मदर्शनातून कशा आल्या आहेत, हे स्पष्ट करतात. गुण-अलंकार व रस यांचा अंतरंग-संबंध ते निदर्शनास आणतात. त्यांच्या ग्रंथांमुळे भारतीय साहित्यशास्त्र आपल्या सर्व अंत:शक्तीनिशी प्रकट झाले आहे.

पु. शि. रेगे खोल व मूलभूत अशा सत्य-सौंदर्याची जपणूक आपल्या कलासृष्टीतून करतात. त्यांचे सौंदर्यशास्त्र काव्यानुभूतीतून व काव्यनिर्मितीच्या प्रत्यक्षानुभूतीतून उद्भवलेले आहे. प्रगाढ भावस्वप्नेतून विलक्षण साक्षित्वाने ते निर्माण झाले आहे.

दि. के. बेडेकर साहित्य व समाज यांच्यातील नात्याचा शोध घेण्यात व ते नाते कलाकृतीत कसे, कोणते रूप घेते, हे पाहणाऱ्या सौंदर्यशास्त्रात रमतात. त्यांचा वाङ्मयीन आलोक विशाल व व्यापक आहे, त्याला तत्त्वज्ञानाचे अधिष्ठान आहे आणि ऐतिहासिकतेचे दर्शन तलतम्य आहे.

गंगाधर पाटील यांचे साहित्यविषयक चिंतन सखोल व स्वतंत्र आहे. विविध तत्त्वप्रणाली व त्यांच्या समीक्षापद्धती आत्मसात करून, मग प्रत्यक्ष समीक्षा करताना गरजेनुसार त्यांचा ते उपयोग करून घेतात. मानसशास्त्र व आदिबंधात्मक समीक्षा यांचे सूक्ष्मदर्शन त्यांच्या लेखनात घडते.

प्रभाकर पाध्ये यांचे 'सौंदर्यानुभव' विषयक विचार तसेच द. ग. गोडसे यांचे कलाविषयक सिद्धांत प्रभावी आहेत. या दोघांशीही लेखकाने संवाद-चर्चा केल्या आणि त्याच वेळी आनंदवर्धन-अभिनवगुप्त यांच्या विचारधारा समजावून घेतल्या.

रा. श्री. जोगांपासून द. ग. गोडशांपर्यंतच्या प्रमुख समीक्षकांच्या साहित्यविचारांचे मुख्य प्रतिपाद्य लेखकाने मार्मिकपणे मांडले आहे. तसेच त्या विचारांचा प्रभाव आपल्याला कसा व किती जाणवला, हेही त्यांनी स्पष्ट केले आहे. हा मागोवा घेताना बा. सी. मर्ढेकरांच्या कलाविमर्शाचा आपल्या साहित्य-कलादृष्टींवर प्रत्यक्ष असा विशेष प्रभाव पडला नाही, हे त्यांनी आवर्जून नमूद केले आहे. मात्र तसे करताना त्यांच्या हातून नकळत एक गफलत झाली आहे. ती अशी : 'मर्ढेकरांची सौंदर्याची मूलतत्त्वे, त्यांची कलेच्या शुद्धतेसंबंधी व त्यांच्या श्रेणी-निश्चितीसंबंधीची मते पुढीलांनी अपवादानेच स्वीकारल्याचे दिसून येते.' असे मत पृ. ९ वर मांडलेले आहे. मात्र लगेच पृ. ९ ची अखेर व पृ. १० चा आरंभ 'मर्ढेकरांची निरूपाधिक कलानिष्ठा आणि विशुद्ध सौंदर्यदृष्टी यांचा प्रभाव पुढील सर्व कलाविमर्शकांवर व साहित्याभ्यासकांवर पडल्याचा दिसून येते.' असे आपले निरीक्षण लेखकाने नोंदले आहे. या दोन मतांतील विरोध समजून घेणे कठीण आहे.

**लेखकाची साहित्यदृष्टी**

लेखकाचा मूळ मनोधर्म केवलाल्हादवादी, कलामूल्यवादी रसिकाचा आहे. कला ही स्वतंत्र व स्वायत्त वस्तू आहे. ती तिच्याच आकृतिरूपात अनुभवणे ही त्याची सहज प्रवृत्ती आहे. कलाकृतीच्या आकलनासाठी तत्कालीन, सामाजिक, ऐतिहासिक कविचरित्रात्मक किंवा अन्य संदर्भ पाहावे लागतात. पण ही समीक्षेची साधने आहेत. ती स्वतंत्रपणे 'साध्य' म्हणून प्रतिष्ठा पावू शकत नाहीत, हे लेखकाने स्पष्ट केले आहे.

रसिकाची व काव्यातील आत्मभूत वस्तूची शेवटची उराउरी भेट होते, ती अनुभूती खरी! ज्ञानात्मक भान इथे नसते. इथे सखोल सधन भावमयता असते. आनंदघन मनोविश्रांती असते. भक्तिमार्गातील ज्ञानोत्तर भक्तीसारखेच हे प्रकरण असते. लेखकाचा हाच दृष्टिकोन आणि 'काव्यानंद हा ब्रह्मास्वादसहोदर असतो' हे मत, या दोहोंतील साधर्म्य लक्षणीय आहे. आपली ही काव्यदृष्टी स्पष्ट करण्यासाठी लेखकाने स्वप्नवासवदत्तम्, महाभारत आणि ज्ञानदेवांची अभंगवाणी याविषयी केलेले विवेचन प्रत्ययकारी आणि रससंपन्न आहे. काव्यातील शांत रसाला त्याने दिलेले रसराजाचे स्थान हे त्याच्या वाङ्मयीन अभिरुचीचे प्रसादचिन्ह आहे.

विवेचनाच्या ओघात लेखकाने काही सुरेख विचार सहजपणे मांडले आहेत. वानगीदाखल काही उदाहरणे उद्धृत करता येतील. 'काव्य कवळावे व आपलेसे करावे' (पृ. १३) 'खरी कविता मनोविलासाप्रमाणे आपल्याकडेच पाहून हसत आहे, असे प्रत्येक रसिकाला वाटते' (पृ. १४) 'काव्य संपले, तरी काव्यानुभूती संपत नाही. आपला पुढचा प्रवास चालूच असतो. काव्याची अनेक संभव रूपे मनात जागी होऊ लागतात.'(पृ. १४) 'साहित्यशास्त्रात अध्यात्म आणू नये हे खरे, पण साहित्यशास्त्राला अध्यात्मशास्त्राचे वावडे असू नये हेही तितकेच खरे आहे' (पृ. १५) 'कलाविलासातले दु:खही आनंदरूप असते,' (पृ. १६) 'शांतरस आस्वादायचा असेल, तर अध्यात्माच्या वायुमार्गाने जाण्याशिवाय गत्यंतर नाही.' (पृ. १७) 'बाहेरून देऊळ पाहण्यापेक्षा आतूनच देव अनुभवता आला पाहिजे.' (पृ. १८) लेखक-वाचक-समीक्षक या सर्वांचे मिळून एक आनंदविश्व असते. (पृ. १९) 'साहित्यव्यापार हा विश्वाचा सुखसंसार असतो.'(पृ. १९)

साहित्यशास्त्र आणि अध्यात्मशास्त्र यातील अनुबंध निकटचा आहे, अशी लेखकाची धारणा आहे. काव्य हा कविप्रतिभेचा विलास आहे आणि विश्व हा चिदानंद शिवाचा प्रज्ञाविलास आहे, असे तो सांगतो. पण ते सांगताना 'अध्यात्म हा शब्द बाजूस ठेऊन 'तत्त्वज्ञान' हा शब्द उपयोजल्याने बरेचसे चालण्यासारखे आहे' हे त्यांचे मत पटण्यासारखे नाही. एकतर 'अध्यात्म' व 'तत्त्वज्ञान' हे परस्परांना पर्याय होऊ शकत नाही. दुसरे असे की, ही अशी 'तडजोड' करण्याचे कारणही नाही.

**मराठीचे भवितव्य**

लेखकाने शेवटच्या चार पानात मराठीचा कैपक्ष साधार व सुसूत्र रीतीने मांडला आहे. आजही असलेला इंग्रजीचा अंमल, माध्यमाचा प्रश्न, आपल्या धर्मसंस्कृतीतून उद्भवलेल्या माय-मराठीची प्रतिष्ठा, अशा मुद्द्यांचे त्यांनी केलेले विवेचन तर्कशुद्ध व प्रत्ययकारी आहे. 'मराठीची 'ॲलर्जी' असणे हे आक्षेपार्ह आहे', तसेच 'भाषा जिवंत ठेवायला जशी ताकद लागते, तशी किंबहुना तीहून अधिक ताकद, ती नाश करायला लागते. हे अनुभवसूत्र आहे. हे त्यांनी ठामपणे बजावले आहे. (पृ. २३) उद्याच्या मराठीचे भाषिक रूप बदलत राहील, हा त्यांचा इषाराही महत्त्वाचा आहे.

लेखकाचे हे मातृभाषाविषयक चिंतन महत्त्वपूर्ण आहे. प्रश्न एवढाच पडतो की, समीक्षाविचार हा या भाषणाचा गाभा आहे. त्याच्या अखेरीस आलेले हे मराठीविषयीचे

विचारदर्शन उपरे वाटते. (यामध्ये चिंतनापेक्षा चिंतन अधिक आहे.) 'आत्मकथनाच्या अंगाने बोलत बोलत मी माझे मनोगत व्यक्त करणार आहे,' (पृ. ३) हे समर्थन लेखक त्यासाठी देऊ शकेल.

**लेखकाचा भाषाविलास**

'अर्थगौरव' (हर्सनेस) या गुणविशेषाने युक्त असलेली लेखकाची विचारमौक्तिके याआधी उद्धृत केली आहेत. आता त्यांच्या लेखणीतून उतरलेली काही सदोष शब्दरूपे तसेच काही मुद्रणदोष नमूद करणे आवश्यक आहे.

१. 'त्यांना त्याची प्रयोजनं असतात.' (पृ. १० ची अखेर)
 'त्यांना स्वत:ची प्रयोजनं असतात.' असे हवे.
२. पृ. ११, ओळ १६, 'मनोवस्था' (मनोऽवस्था)
३. पृ. ११, ओळ १७, 'तादात्म्य होणं' (तादात्म होणं' ४.)
 पृ. १३, ओळ खालून पाचवी
 'काव्य हे......गोष्ट आहे.' (ही गोष्ट)
५. पृ. १५, ओळ चौथी
 'अशावेळी' (अशा वेळी)
६. पृ. १५, ओळ पाचवी
 'कविप्रतिभेचं नैर्मल्य' (?)
७. पृ. १६, ओळ १९ वी
 'त्याहून' (त्यातून)
८. पृ. १६, ओळ खालून तिसरी
 'विश्वस्त्रष्टा' (विश्वस्तष्टा)
९. पृ. १७, ओळ खालून सहावी
 'प्रतिभासिक' (प्रातिभासिक)
१०. पृ. २४, ओळ ७ वी
 'ती तिचा काळ' (ती आपला काळ)

(तसेच, पृ. १३ व १४ या पानांवरील इंग्रजी मजकुराचा मराठी भावार्थ दिलेला नाही.)

**समारोप**

समीक्षा विषयक भाषणसंहितेची 'समीक्षा' करताना वरील त्रुटी (किरकोळ स्वरूपाच्या असल्या तरी) निदर्शनास आणून देणे जरूरीचे आहे, असे वाटते. म्हणूनच केवळ त्या उद्धृत केल्या आहेत.

आपल्या पूर्वसूरींच्या समीक्षाविचारांचे ऋण नेमकेपणाने शब्दबद्ध करून, लेखकाने त्यांच्याविषयीची कृतज्ञता व्यक्त केली आहे. पण तिथेच तो थांबला नाही. सूर्यकिरण स्फटिकाच्या लोलकातून पलीकडे गेल्यास ते परावर्तित होतात आणि त्या लोलकाच्या गुणधर्मांमुळे त्यातून एक नयनमनोहर रंगचित्र तयार होते. प्रस्तुत भाषणसंहितेत तसेच काही घडल्याचे जाणवते. ज्येष्ठ समीक्षकांचे साहित्यविचार लेखकाच्या प्रज्ञेने आत्मसात केले. या विचारांचे त्याने अन्वयार्थमूलक विवेचन केले. ते विचार आणि स्वत:चे साहित्यचिंतन या सर्वांचे एक अद्‌भुत रसायन ('फ्यूजन') त्याच्या विचारविश्वात तयार झाले. लेखकाची प्रस्तुत भाषण-संहिता म्हणजे या विचारमंथनातून सिद्ध झालेली फलश्रुती होय!

□

डॉ. हे. वि. इनामदार
११, मंगेश पार्क,
सर्व्हे नं. ३८/१ अ, एरंडवणे,
पुणे ४११ ०३८.

# काव्यानंद

डॉ. शंतनू वसंत चिंधडे

---

खऱ्या अर्थाने काव्य वाचनाचा नितळ आनंद देतील असे काही काव्यसंग्रह हाताशी आले आहेत. पत्रिकेच्या चोखंदळ वाचकांना या संग्रहांचा परिचय करून देताना मन उल्हासित आहे.

---

**आत्मभानाची सच्ची कविता !**

'अनिकेत' कवयित्री सौ. प्रभा सोनवणे. एकूण एक्कावन्न कवितांचा समावेश असलेला हा काव्यगुच्छ रसिकांपुढे आला आहे. ख्यातनाम ललित लेखक श्री. रवींद्र पिंगे आपल्या 'आस्वाद' पर मनोगतात म्हणतात, 'ग्रामीण ढंगाचं टिपूस सुद्धा रचनेत नाही. कविता अस्सल नागरी आहेत. शहरीपण व्यथित हृदयाचे ते हुंकार आहेत. व्यथा नेमकी कसली? तर जग तिला मुखवटेबाज दिसलं आणि संवादी सूर अप्राप्य राहिला. या गोष्टीचं दु:ख कवयित्रीला उदास करतं. शब्दाला शब्द जुळविणाऱ्या तकलुपी कवींच्या चिमण गर्दीतून त्या बाहेर पडोत आणि कमीत कमी शब्दात आशयाचा घाटदार नि एकात्म अविष्कार करण्याची विद्या निरंतर व्यासंगातून कवयित्रीला प्राप्त होवो...' वगैरे.

स्वत: कवयित्री आपल्या मनोगतात म्हणते, 'मला स्वत:ला सुद्धा माझ्या फार थोड्या कविता मनापासून आवडतात. जीवनाच्या कोलाहलात कविता सोबतीला नसती तर जगणं मुष्किल झालं असतं. माझी कविता साधी, बेशिस्त आणि अडाणी आहे. एखाद्या जिप्सीसारखी ती अजूनही भटकते आहे. ठावठिकाणा नसल्यासारखी ती मनात जशी रेंगाळते तशीच कागदावर उतरते. अवघड, अवखळ... कधी हातात गवसलेली, कधी हातातून निसटलेली.' उपोद्घातात कवयित्री म्हणते,

*मी माणूस आहे*
*संत नव्हे...*
*माझी कविता —*
*एक वेदना...*
*अभंग नव्हे...!*

एवढी प्रांजळ आणि स्पष्ट भूमिका घेऊन प्रभाताई आपला हा पहिला-वहिला काव्यसंग्रह 'अनिकेत' रसिकांपुढे आणतात. सुदैवाने साहित्य संस्कृती मंडळानेही त्यांना मदतीचा हात दिला आहे. बालपण, बालमैत्रिणी, यौवनसुलभ प्रेमभावना, पुढे स्त्रीच्या वाट्याला येणारी दु:खे, भोग, निराशा, अन्याय, वंचना आणि एकूणच वैफल्य असा एकूण आशयविशेष व्यक्त करणाऱ्या या छोट्या-मोठ्या आवाक्याच्या कविता आहेत.

आपल्या पहिल्याच 'जीवन-मृत्यू' या कवितेत त्या म्हणतात, 'आईला वेदना देत मी या जगात आले. तिची ऊब आणि ममतेचा ओलावा चारच दिवस दिसला. नंतरचे दिवस 'असेच' जाताहेत. पाय पोळताहेत, हात भाजताहेत, हृदयातील वणवा नित्य धगधगतो



अनुक्रमणिका






आहे. दु:खाची आणि द्वेषाची आग विझवणाऱ्या त्या दिवसाची मी वाट पहात आहे.' एकूणच स्त्री जातीचे सनातन दु:ख व्यक्त होत राहते.

जीवनाच्या या असह्य वाटचालीत काही सुखाचे शिडकावेही कवयित्रीच्या अंगावर पडतात. बालमैत्रिणीची आठवण, ते 'सुनहरे' क्षण मनात रुंजी घालतात. शाळेच्या चिंब भिजलेल्या वाटेवरून सखीचे हात हातात घेऊन केलेली पायपीट, झाडाखाली थांबून पाऊस कसा चुकवला, वर्गाच्या खिडकीतून अंगावर पडलेले तुषार, सखीच्या डोळ्यांत उमललेली कविता... अशा त्या मधुर स्मृती. नंतर पुढच्या आयुष्याच्या वाटचालीत झालेला प्रीतीचा स्पर्श —

*'बकुळ वृक्षाखाली*
*फुले वेचावीत*
*तसे तुझे शब्द —*
*वेचते ओंजळभर...*
*आणि हुंगत रहाते*
*तो शब्दसौरभ*
*रात्रंदिवस... !'*

मात्र प्रेमातली तखलीही वाट्यास येऊन,

*स्वप्नातले सारे रंग*
*आता उडून गेले —*
*मी चित्र रेखाटणेही*
*— आता सोडून दिले...!*

अशी अवस्था प्राप्त होते.

'जन्मापासून मृत्यूपर्यंत
स्त्रीभोवती असतो —
एक अदृश्य तुरुंग... !
दिसत नसला तरी
पहारा करीत असतो
कुणाच्या तरी डोळ्यांतला सुरुंग... !

असे दारुण वास्तवही त्यांना जाणवत राहते.

स्वत:च्या शोधात जेव्हा आपण एकट्या निघालो तेव्हा आढळलेले दुनियेचे रूप नकली निघाले. जे प्रामाणिक आणि थोर वाटले होते ते सगळे संधिसाधू आणि चोर निघाले असा कवयित्रीचा अनुभव त्यांच्या 'अनिकेत' कवितेत प्रकट होतो. स्वत:च्या घरातच आपण 'अनिकेत' ठरतो ही खंत व्यक्त होते.

बहुतांशी नवे कवी गझल लिहिण्याचा प्रयत्न करतात. येथेही तसा आढळतो. मात्र गझलेचे रचनातंत्र नीट समजावून घेऊन त्यात जास्तीत जास्त सफाई येणे महत्त्वाचे असते. रचनेतील चांगला विचार, परस्परांना छेद देणारी कल्पना, भावना आणि विशिष्ट 'धक्का' तंत्र उत्तम जमले तरी रचनेतील सफाई अत्यावश्यक म्हटली पाहिजे. अन्यथा गझल फसते. ते गीत होते.

एकंदरीने कवयित्रीचा हा पहिला-वहिला संग्रह असूनही एक चांगला प्रयत्न त्यांनी रसिकांपुढे ठेवला आहे. अंतर्मनातल्या वेदना, स्त्रीदु:ख, अन्याय, विरह, शोषण आदि भावना नीटसपणे व्यक्त झाल्या आहेत. छंदोरचना तंत्राचे भान मात्र ठेवणे महत्त्वाचे आहे. त्यांचा पुढील संग्रह अधिक रसरशीत व दमदार पाऊले टाकीत पुढे येईल अशी खात्री हा संग्रह देतो, हे मुद्दाम नमूद करून ठेवतो.

*'आनिकेत' : कवयित्री सौ. प्रभा सोनवणे,*
*नीहारा प्रकाशन, पुणे*

□

**समंजस, आशावादी कविता !**

'शतकाच्या उंबरठ्यावर' कवयित्री : नीलम माणभावे यांच्या पुण्याच्या मनोदय

प्रकाशनाने प्रकाशित केलेल्या या संग्रहात एकूण बासष्ट कविता आहेत. सुरुवातीच्या उत्तेजनपर प्रास्ताविकात कवयित्री डॉ. अश्विनी धोंगडे म्हणतात, 'गेल्या दहा-पंधरा वर्षांमध्ये स्त्रियांनी लिहिलेल्या कविता एका वेगळ्या अंगाने जीवनाचा शोध घेताना दिसत आहेत. स्त्री स्वतःचे स्वतंत्र व्यक्तित्व शोधू लागली आहे. सौ. माणगावे या काही कोणी मुरब्बी कवयित्री नाहीत, पण त्यांची धडपड वाखाणण्याजोगी आहे. त्यांच्याकडे सुंदर शब्दांची लेणी नाहीत, वृत्त-मात्रेची काकणं नाहीत, कवितेच्या आकृती बंधाची गोंडस रूपे नाहीत. पण त्यांची कविता सच्ची आहे आणि साधेपणातलं सौंदर्य तिच्याकडे आहे.'

कवयित्री आपल्या मनोगतात म्हणते, 'उण्यापुऱ्या चार-पाच वर्षांपासूनचा माझा लेखनप्रवास. मी उच्चविद्याविभूषित एखादी विदुषी नाही की जगाच्या अनुभवाचं संचितही माझ्याजवळ नाही. कलात्मक दृष्टीने माझ्या कविता परिपूर्ण नाहीत. शब्दांचं माधुर्य किंवा प्रतिकांचं सौंदर्य माझ्या कवितेत नाही. पण मला जे वाटलं, जे भावलं, जे दुखलं, खुपलं, चुरचुरलं, चटका लावून गेलं तेच मी सरळ, साध्या भाषेत प्रामाणिकपणे आणि निर्भीडपणे लिहिलं.

आपली कविता नक्की कशी आहे, हे सांगताना कवयित्री म्हणते, 'माझी कविता साधी, सोपी असून जीवनातली अगम्य कोडी ती सहजतेने सोडवते आहे... तिला वेडी-वाकडी वळणे ठाऊक नाहीत. पायाखालचे खाचखळगे ती लीलया ओलांडते, जागेपणीचे स्वप्न पाहून आकाशाला कवेत घेते... मातीशी नाते सांगते, वास्तवाचे भान राखते, शिवाय चराचराला स्पर्श करते, मनामनाचा दुवा सांधते... !

या दोनही अभिप्रायातून रसिक वाचकाला संग्रहात आपणास काय भेटणार आहे, याची पूर्ण कल्पना येते व त्याचा वाचनप्रवास विनासायास होत राहतो. बहुतांशी कविता मुक्त लयीतल्या आहे. 'बोलगाणी' म्हणून ज्या काव्यप्रकाराला ओळखता येईल, अशा धर्तीवर बऱ्याच रचना आहेत.

*'तुझ्याच साठी जगले आता*
*जगेन मी माझ्यासाठी...*
*स्त्री म्हणून नाही तर*
*माणूस म्हणून मरण्यासाठी... !*

किंवा,

*'फुलांनी स्वप्न -*
*फुलवायचं कसं*
*फुललेलं स्वप्न*
*झुलवायचं कसं... !'*

अशा साध्या, सुगम रचनातून कवयित्री रसिकांशी हितगुज करत राहते. खास 'स्त्रीवादी' म्हणता येतील अशा बऱ्याच कविता संग्रहात आहेत... 'मी', 'सांग द्रौपदी सांग सावित्री', 'खिरापत', 'पिशवी' इत्यादी बहुतांशी कवितांतून स्त्रीचं दैनंदिन जीवन, तिचं भावजीवन, मान-अपमान, अवहेलना, वैफल्य, निराशा, परिसर, नातलग, जिवलग आणि कविता या विषयीच्या भावना वा कल्पना साध्यासुध्या शब्दात प्रकट होत राहतात.

'शतकाच्या उंबरठ्यावर', 'माझी कविता', 'फुलकाट्यांचा दरवळ' अशा छंदोबद्ध रचना अधूनमधून आपणास भेटत राहतात, मात्र, गणमात्रा व 'यति दोष' चोखंदळ वाचकांच्या लक्षात आल्याशिवाय राहत नाही.



अनुक्रमणिका






*'किती काळची मी उभी...*
*सुअी दोरा घेऊनी हाती*
*किती घातले टाके बाई*
*किती जोडली नाती...'*

किंवा,

*'सांग माझ्या भोलेनाथा...*
*पाऊस पडेल काय?...'*

अशा ओळी एका प्रसिद्ध बालगाण्याची आठवण देतात. मात्र हे अपवादात्मक.

थोडक्यात भोवतालचं साधंसुधं, प्रसंगी कठोर, ग्रामीण गृहिणीच्या वाट्याला येणारे हर्षविमर्ष, वेदना कवयित्री रसिकांपर्यंत पोहोचवण्यात बरीच यशस्वी होते. संभाव्य यशाची बीजे संग्रहात आढळतात.

*'शतकाच्या उंबरठ्यावर' : कवयित्री नीलम माणगावे, मनोदय प्रकाशन, पुणे.*

□

**काव्यशिल्प -**
**'हौशी पण लोभसवाणे शब्दवैभव'**

गेली पंचवीस वर्षे पुण्यातील नवोदितांच्या काव्यप्रांतात सातत्याने कार्यरत असलेल्या 'काव्यशिल्प' संस्थेचे रौप्यमहोत्सवी वर्ष साजरे होतानाच हा प्रातिनिधिक काव्यसंग्रह रसिकांपुढे सादर झाला आहे. संस्थेतील निवडक कवींच्या संपादक-मंडळाने सर्व सोपस्कार केले आहेत.

संस्थेचे एक संस्थापक श्री. लेले आपल्या सुरुवातीच्या मनोगतात म्हणतात, '१९७२ साली मराठी कविता ऐन भरात होती. अनेक प्रथितयश कवी गाजत होते. त्यांचे काव्यसंग्रह निघत होते. त्यांची कविसंमेलने झडत होती. त्यांना प्रसिद्धी मिळत होती. या साऱ्या धामधुमीत बिचाऱ्या नवोदित कवींची मोठी कुचंबणा होत होती. त्यांनी कविता केल्या तरी त्या ऐकणार कोण? दाद देणार कोण? छापणार कोण? या अडचणीतून मार्ग काढण्यासाठी १९७२ मध्ये प्रसंगाप्रसंगाने 'काव्यशिल्प' संस्थेची स्थापना झाली.

नित्यनैमित्तिक मासिक बैठकांतून नवोदितांच्या कविता ऐकणे-ऐकविणे अशा आदान-प्रदानातून या महोत्सवी वर्षानिमित्त एक आठवण म्हणून या संग्रहाचे प्रकाशन केले आहे. यापूर्वीही असाच एक प्रयत्न संस्थेचे त्यावेळचे अध्यक्ष डॉ. शंतनू चिंधडे यांनी केला होता. 'शब्दवेणा' हा ४० प्रातिनिधिक कवींच्या कवितांचा गुच्छ त्यांनी रसिकांपुढे ठेवला होता. प्रस्तुत 'काव्यशिल्प' मध्ये तब्बल ९० कवींच्या कविता असून त्यातील काही नावे आपल्या प्रतिभाबळाने काव्यप्रांतात आपली आश्वासक पाऊले टाकीत मार्गक्रमण करीत आहेत.

खरे तर एक उपक्रम म्हणून असे प्रातिनिधिक संग्रह कौतुकास्पदच असतात. रसिक वाचकांची काव्यतृष्णा काही प्रमाणात ते शमवतात देखील. मात्र व्यक्तिशः त्या त्या कवीला किती न्याय मिळतो, हा एक प्रश्नच आहे. स्वतंत्ररीत्या काव्यसंग्रह निघतो तेव्हाच 'तो' कवी 'काहीसा' रसिकांपुढे उभा ठाकतो. मात्र राजापुरी गंगेप्रमाणे कधीतरी कविता लिहून अशी प्रसिद्धी कितीसे श्रेय पदरात पाडते बरे?

वर उल्लेख केलेले प्रश्न मनात उभे राहिले तरी एक मात्र खरे की हा एक चांगला तजेलदार 'काव्यगुच्छ' रसिकांपुढे आला आहे, यात संदेह नाही. मुक्त, अतिमुक्त, छंदोबद्ध आणि क्वचित वृत्तबद्ध अशा सर्व प्रकारच्या रचना संग्रहात आहेत. विषयांचा आवाका देखील वैविध्यपूर्ण आहे. चंद्र, चांदणे, जीवन-मृत्यू, श्रावण, बंद दार, उघडे दार, राधा, रेणुका,

माणसं, पाऊल, मीलन, विरह, उन-सावली वगैरे चिरंतन विषय प्रतिमा-प्रतिकांच्या रूपाने पानोपानी भेटत राहतात. पण जानवे, देशस्थ-कोकणस्थ वाद, अनाथ बालक, विठूराया असे 'सनातन' विषय देखील कवींनी हाताळले आहेत. आसावरी काकडे, अंजली कुलकर्णी, विद्या अन्यापनावर, मीरा शिंदे, स्वाती सामक, स्नेहसुधा कुलकर्णी, मीनल बाठे, संगीता बर्वे, घन:श्याम धेंडे, प्रभाकर तामणे, उषा दातार वगैरे वगैरे साहित्य प्रांतात स्थिरावलेली नावे यात आहेतच पण अगदी 'नवखे' कवीदेखील एकमेकांच्या शेजारी पानापानावर नांदताना दिसतात.

काही नमुने पहाण्यासारखे आहेत.

'स्त्री' या कवितेत साधना गोखले आजची प्रातिनिधिक भारतीय नारी परिणामकारकतेने रसिकांसमोर उभी करतात.

*'बोलू नकोस चालू नकोस...*  
*खेळू नकोस नाचू नकोस*  
*हसू नकोस बागडू नकोस*  
*रडू नकोस... चिडू नकोस...*  
*— कारण तू एक स्त्री आहेस... !'*

आसावरी काकडे यांच्या अंतर्मुख करणाऱ्या ओळी पहा —

*'आवरते पसारा...*  
*दारे बंद होती ना —*  
*कित्येक वर्षं —*  
*मीही आत्ताच आलेय परत*  
*बाहेरचं सगळं आवरून*  
*लक्षातच आलं नाही —*  
*आतलंही आवरायला झालं असेल ते... !'*

आणि,

*'हे नि:संदर्भ दिवसांचे ओझे —*  
*रात्रीच्या पाठीवर लादून कुठपर्यंत जाणार...*  
*मागून पुढून दिवसेंदिवस चढत जातात...*  
*सोशिक मनावर अबोध व्यथांचे थर...'*

भारती कुलकर्णींच्या या आशयगर्भ ओळी रसिकांच्या मनात थरार निर्माण करतात.

संग्रहात काही चांगल्या गझला देखील आहेत. उदा.

*'सुखासुखी भाकरी मिळे का कधी कुणाला*  
*बसावयाचे असेल चटके... तव्याप्रमाणे...*  
*तशात ही सांजवेळ हळवी उदासवाणी...*  
*कुठून ये आर्त धूनही... मारव्याप्रमाणे...*

अशा भावगर्भ ओळी घन:श्याम धेंडेंच्या कवितेतून आपल्याला भेटत राहतात.

अगदी नवोदित वाटावे असेही बरेच लिखाण संग्रहात विखुरलेले आहे. 'श्रावण गाणे', 'कविता', 'शापित कलाकार', 'जीवन', 'गृहदशा' वगैरे उदाहरणे त्या दृष्टीने तपासण्यासारखी आहेत. 'फुलझाडीत रक्तगंध टरफले' सारखी एक खऱ्या अर्थाने 'ॲबसर्ड' कविता आपणास भेटते व आपण चक्रावून जातो.

एकंदरीनेच विविध प्रकारची कविता वाचणाऱ्या काव्यप्रेमी-रसिकाला रिझवील असे हे 'काव्यशिल्प' आहे, यात काही संदेह नाही. मराठी कवितेच्या विपुल उधानात हे शिल्प झाकोळलेले राहू नये, ते अधिकाधिक काव्यप्रेमी मंडळींना आस्वादायला मिळावे, अशी सदीच्छा प्रकट करतो आणि थांबतो.

□

डॉ. शंतनू वसंत चिंधडे  
९/११४६, सूरश्री, लकाकी मार्ग,  
पुणे ४११ ०१६.



अनुक्रमणिका






## ग्रंथ पुरस्कार

पुणे नगर वाचन मंदिरातर्फे प्रतिवर्षी तीन उत्कृष्ट ग्रंथांना प्रत्येकी रुपये एक हजाराचा पुरस्कार दिला जातो. यंदाचे पुरस्कार १९९८ मध्ये (१ जानेवारी ते १५ डिसेंबर ९८) प्रकाशित झालेल्या ग्रंथांना देण्यात येणार आहेत.

१३ जानेवारी - कै. श्री. ज. जोशी पुरस्कार : 'ललित लेख, प्रवास, व्यक्तिचित्रे' या स्वरूपाच्या ग्रंथाला.

७ फेब्रुवारी - कै. ह. स. गोखले पुरस्कार : 'संतवाङ्मय विषयक स्वतंत्र वा संपादित ग्रंथाता'

६ मार्च - कै. श्री. ना. बनहट्टी पुरस्कार : 'वैचारिक स्वरूपाच्या ग्रंथाला'

ज्या लेखकांना वा प्रकाशकांना या पुरस्कारांसाठी ग्रंथ पाठवावयाचे असतील, त्यांनी ग्रंथाच्या दोन प्रती कार्यवाह, पुणे नगर वाचन मंदिर, १८१ बुधवार पेठ, बेलबागेसमोर, पुणे २ या पत्त्यावर पाठवाव्यात. ही विनंती.



अनुक्रमणिका






## का. स. वाणी मराठी प्रगत अध्ययन संस्था, धुळे
## चर्चासत्र : साहित्य आणि राजकीय आशय

यावर्षी भारतीय मराठी अभ्यास परिषदेचे १० वे अधिवेशन का. स. वाणी मराठी प्रगत अध्ययन संस्था, धुळे येथे दि. १, २, ३ जानेवारी १९९९ (शुक्र, शनि, रवि) या दिवशी आयोजित करण्यात येत आहे.

या अधिवेशनात 'साहित्य आणि राजकीय आशय' या विषयावर चर्चासत्र आयोजित करण्यात आले असून कळत नकळत आपले सगळे जीवनच राजकीय आशयाने घेरलेले आहे. या पार्श्वभूमीवर 'राजकीय आशया'ची समग्रता लक्षात घेऊन सत्ता, शोषण, स्वातंत्र्य, दास्य, धूरीणत्वल हक्क आणि कर्तव्ये, हिंसा-अहिंसा या पायाभूत संकल्पनांची व्यापक चर्चा करणे, विविध राजकीय प्रणालींचा व या संकल्पना घटकांचा संदर्भ ध्यानात घेऊन वाङ्मयीन घडामोडी आणि साहित्य संहितेतील आशयाची चिकित्सा व समीक्षा करणे हे या अधिवेशनातील चर्चेचे मुख्य केंद्र असेल. त्या अनुषंगाने राजकीय साहित्याच्या घाटाची वा आकृतिबंधाची, शैलीविशेषांची चर्चाही ओघानेच येईल.

चर्चेच्या उपयोजनात मराठी साहित्य हे केंद्रस्थानी असले तरी भारतीय साहित्य, आशिया खंडातील साहित्य आणि पाश्चात्य साहित्यातील काही प्रभावक्षेत्रांचीही चर्चा होईल.

अधिवेशनातील निबंधवाचन व चर्चेचे माध्यम मराठी, हिंदी, इंग्रजी व गुजराथी अशा चार भाषांतून असेल. हे निबंध 'आमची श्रीवाणी' या नियतकालिकातून चर्चेच्या गोषवाऱ्यासह प्रसिद्ध केले जातील. आमंत्रितांखेरीज स्वयंस्फूर्तपणे निबंध पाठविणाऱ्यांचे निबंधही अधिवेशनात सादर केले जातील व नियतकालिकाच्या विशेषांकात प्रसिद्ध केले जातील. मात्र त्यासाठी निबंधलेखकांनी आपला निबंधाचा विषय सविस्तर रूपरेषेसह ३१ ऑगस्ट १९९८ पर्यंत संस्थेकडे पाठवावा. निबंधाचा विषय स्वीकारल्यासंबंधीचा निर्णय संस्थेकडून २० सप्टेंबरपर्यंत कळविण्यात येईल. त्यानंतर ३० नोव्हेंबरपर्यंत निबंधलेखकांनी आपापल्या निबंधांची संहिता हस्तलिखित/टंकलिखित स्वरूपात संस्थेकडे पाठवावी.

अधिवेशन सर्वांसाठी खुले असून महाराष्ट्र व महाराष्ट्राबाहेरील प्रतिनिधींना रु. १५० शुल्क भरून सहभागी होता येईल. प्रतिनिधींना या शुल्कातच तीनही दिवसांचा नाश्ता-भोजन व सर्वसामान्य निवास-व्यवस्था तसेच मुद्रित निबंधसंच उपलब्ध करून देण्यात येतील. उपस्थित राहू इच्छिणाऱ्या प्रतिनिधींनी आपली नावे १० डिसेंबर १९९८ पर्यंत प्रतिनिधीशुल्कासह संस्थेकडे पाठवावीत.

आपले,

**पत्रव्यवहारासाठी पत्ता :** का. स. वाणी मराठी प्रगत अध्ययन संस्था,
उन्नतीनगर, नकाणे रोड, देवपूर, धुळे ४२४ ००२
दूरध्वनी : २३६५४, २२७६५



अनुक्रमणिका






## म. सा. प., पुणे नवीन आजीव सदस्य

१. मोरे अश्विनी अरविंद, पुणे.
२. पुरंदरे संजय श्रीहरी, पुणे.
३. जोशी शेषा रंगनाथ, डोंबिवली.
४. कुलकर्णी चंद्रमोहन वासुदेव, पुणे.
५. जोशी प्रशांत प्रकाश, पुणे.
६. ठुबे शांता दामोदर, श्रीरामपूर.
७. पवार संतोष पद्माकर, श्रीरामपूर.
८. गोसावी आनंद वसंत, डोंबिवली.
९. फाटक विकास मधुकर, ठाणे.
१०. भट हेमांगी वि., ठाणे.
११. रेगे सुनंदा हरिहर, ठाणे.
१२. साठे केशव श्रीपाद, पुणे.
१३. काते भारत गोपाळ, मुंबई.
१४. बगाडे सुभाष दिगंबर, पुणे.
१५. पाटील तानाजी राऊ, कोपरगाव.
१६. शिंदे विश्वनाथ काशीनाथ, कोल्हापूर.
१७. काळे आशा सतीशचंद्र, पुणे.
१८. चितळे प्रभाकर अनंत, पुणे.
१९. खेरे भास्कर गजानन, पुणे.
२०. भार्गव मनोहर नारायण, पुणे.
२१. पंगु आनंद नारायण, पुणे.
२२. काळभोर वैशाली सखाराम, चिंचवड.
२३. सरसे दिलीप कान्हु, पाथर्डी.
२४. शिंदे शशिकांत लक्ष्मण, पाथर्डी.
२५. नानल विद्या प्रभाकर, ठाणे.
२६. नाईक संजय बाबुलाल, पुणे.
२७. कुलकर्णी निलीमा, पुणे.
२८. सोनावणे मनोहर रामदास, पुणे.
२९. सप्रे संदेश दत्तात्रय, पुणे.
३०. आठवले अविनाश भालचंद्र, पुणे.
३१. भामरे रवींद्र संभाजी, धुळे.
३२. पवार शंकर मारुती, धुळे.
३३. भिडे बबन सोनू, पुणे.
३४. नुळे व्यंकटेश दत्तात्रय, सोलापूर.
३५. गोसावी श्रीपाद दत्तात्रय, सोलापूर.
३६. पुजारी सुहास गोविंद, सोलापूर.
३७. सोलनकर कुमार गोविंद, सोलापूर.
३८. जैनसास्तुरे मधुकर सिद्धप्पा, सोलापूर.
३९. ठोकळ बिपीन, सोलापूर.
४०. दावे अनुराधा मोहन, डोंबिवली.
४१. देशपांडे नीळकंठ माधव, डोंबिवली.
४२. शेपाळ तात्याबा मुरलीधर, डोंबिवली.
४३. साने धनश्री संजय, डोंबिवली.
४४. शेवडे अशोक, डोंबिवली.
४५. परांजपे श्रीराम सदाशिव, पुणे.
४६. पारगांवकर अरविंद दिगंबर, पाथर्डी.
४७. सोलट विलास धोंडिबा, पाथर्डी.
४८. बडे आजीनाथ मारुती, पाथर्डी.
४९. चंडक किशोर श्रीवल्लभ, सोलापूर.
५०. पवार माधव रामचंद्र, सोलापूर.
५१. पंडित काशिनाथ कृष्णाजी, सोलापूर.
५२. शेठ प्रियांका प्रविण, पुणे.
५३. पाटसकर रवींद्र विष्णु, कोल्हापूर.
५४. वेलींग सुधीर अनंत, पुणे.
५५. सिन्नरकर अतुल व्यंकटेश, ठाणे.
५६. कुलकर्णी पद्माकर शं., ठाणे.
५७. कदम जनार्दन राजाराम, राहुरी.
५८. नाडपुरोहित वासंती श्रीकांत, पुणे.
५९. देसाई माधव राजाराम, पुणे.
६०. आरोळे मोहिनी सुभाषचंद्र, पुणे.
६१. इनामदार मालती नागनाथ, पुणे.
६२. देशपांडे चारुदत्त विलास, पुणे.
६३. मोहिते अजित पांडुरंग, पुणे.
६४. खरे शैलेश, पुणे.
६५. भिडे अतुल, पुणे.
६६. कारभासे मुकुंद नरहर, सोलापूर.
६७. गायकवाड देवीदास, सोलापूर.
६८. धोडे सुरेखा शशिकांत, पुणे.
६९. सुवर्णकार बालाजी रामचंद्र, नांदेड.
७०. कुलकर्णी अनंत अरविंद, पुणे.
७१. कुलकर्णी दीपा यशवंत, आजरा.
७२. पंडित बाळ विश्वनाथ, पुणे.
७३. भुतकर शुभांगी शशिकांत, सातारा.
७४. कांबळे पुष्पलता प्रदीप, पुणे.



अनुक्रमणिका

# म. सा. प. कार्यवृत्त

एप्रिल-मे-जून ९८

**दि. १० एप्रिल ९८ :** ज्ञानकोशकार डॉ. केतकर स्मृतिदिन : सकाळी ८ वाजता डॉ. केतकरांच्या समाधीस पुष्पांजली समर्पण केली. कमला नेहरू उद्यान, एरंडवन, पुणे ४. प्रा. स. ह. देशपांडे यांचे 'जातिसंस्थेचे अर्थशास्त्र' या विषयावर सायंकाळी साडेसहा वाजता म. सा. प. माधवराव पटवर्धन सभागृहात व्याख्यान झाले.

**१३ एप्रिल १९९८ :** कै. शं. ना. जोशी स्मृति-पारितोषिक :

थोर इतिहाससंशोधक कै. शं. ना. जोशी यांच्या स्मृतिप्रीत्यर्थ्य म. सा. परिषदेतर्फे दिले जाणारे पारितोषिक (रुपये पाच हजार) या वर्षी डॉ. अंजाले कीर्तने यांना 'डॉ. आनंदीवाई जोशी : काळ आणि कर्तृत्व' (मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई) या ग्रंथावद्दल श्रीमती शांता किर्लोस्कर यांच्या हस्ते देण्यात आले.

**दि. १५ एप्रिल १९९८ :** प्रा. न. र. फाटक स्मृति-पारितोषिक :

प्रा. न. र. फाटक स्मृति-प्रतिष्ठान, मुंबई यांनी म. सा. परिषदेस दिलेल्या देणगीच्या व्याजातून दर तीन वर्षांनी एका ज्येष्ठ संशोधकास 'प्रा. न. र. फाटक स्मृति पारितोषिक' देण्यात येणार आहे.

ख्यातनाम संस्कृत पंडित व टिळक महाराष्ट्र विद्यापीठाचे माजी कुलगुरू डॉ. चिं. ग. काशीकर यांच्या हस्ते यंदाचे हे पारितोषिक डॉ. म. अ. मेहेंदळे यांना देण्यात आले. या वेळी डॉ. मो. गो. धडफळे यांनी डॉ. मेहेंदळे यांच्या संशोधनकार्याचा परिचय करून दिला.

**दि. २९ एप्रिल १९९८ :** कै. प्रा. श्री. के. क्षीरसागर स्मृतिव्याख्यान :

महाराष्ट्र साहित्य परिषद आणि प्रा. श्री. के. क्षीरसागर स्मृतिसमिती यांच्या संयुक्त विद्यमाने प्रा. श्री. के. क्षीरसागर यांच्या १८ व्या स्मृतिदिनानिमित्त श्री. अशोक जावडेकर यांचे व्याख्यान आयोजित केले. (विषय : श्री. के. क्षी. जीवन आणि तत्त्वज्ञान) कार्यक्रमाचे अध्यक्षस्थान प्रा. डॉ. व. दि. कुलकर्णी यांनी भूषविले.

**४ मे १९९८ :** राज्य मराठी विकास संस्था, मुंबई, महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांच्या संयुक्त विद्यमाने विशेष कार्यक्रम आयोजित केला. परिषदेच्या माधवराव पटवर्धन सभागृहात श्रीमती सुचेता चापेकर यांनी 'तन्जावरी नृत्यशैलीचे विशेष' हा कार्यक्रम सादर केला.

**दि. २६ मे १९९८ :** वार्षिक ग्रंथपारितोषिक वितरण समारंभ :

म. सा. परिषदेतर्फे प्रतिवर्षी ग्रंथपारितोषिक वितरण समारंभ साजरा केला जातो. हा समारंभ सायंकाळी ६ वा. परिषदेच्या माधवराव पटवर्धन सभागृहात आयोजित केला होता. १९९७ मधील विविध वाङ्मय प्रकारांतील उत्कृष्ट पुस्तकांना तसेच तत्त्वज्ञान, संतसाहित्य, संगीत, दलित साहित्य या क्षेत्रात दीर्घ काळ लेखन केलेल्या लेखकांना विशेष पारितोषिके

करण्यात आला.

म. सा. प. शाखा इस्लामपूरच्या २ जून १९९८ रोजी झालेल्या सभेत शाखेच्या अध्यक्षपदी डॉ. मधुकर हसमनीस यांची निवड झाली. कार्याध्यक्षपदी प्रदीप यशवंत पाटील यांची निवड झाली. याचवेळी इतर पदाधिकारी व कार्यकारिणी सदस्यांचीही निवड झाली.

**जळगाव शाखा**

२३ मे १९९८ ला प्रा. रमेश पाटील, जळगाव यांचे 'स्व. डॉ. भाऊसाहेब कोलते 'व्यक्ती आणि कार्य' या विषयावर व्याख्यान झाले. पाहुण्यांचा परिचय प्रा. मधुकर साळुंखे यांनी करून दिला. अध्यक्षस्थानी कवी धो. व. जोगी होते. श्रद्धांजलीचा ठराव कवी नारायण शिरसाळे यांनी मांडला. म.सा.प.चे जळगाव जिल्हा प्रतिनिधी म्हणून त्यांची निवड झाली आहे.

महाराष्ट्र साहित्य परिषद, जळगाव शाखेची त्रैवार्षिक सभा ५।४।९८ ला झाली. या सभेत १९९८ ते २००१ या कालावधीसाठी पदाधिकारी व कार्यकारिणी सदस्यांची निवड झाली. अध्यक्ष म्हणून कवी नारायण शिरसाळे आणि कार्याध्यक्ष म्हणून प्रा. दिनेश पाटील यांची निवड झाली.

□

राजा फडणीस
प्रमुख कार्यवाह, म. सा. प., पुणे.

---





अनुक्रमणिका

